

# बालभारती



## मराठी पुस्तक चौथे

शिक्षणखात्याच्या मंजुरीचा क्रमांक : पपम १०० (भाषा) ४ ड : दि. ११-२-७०

# बालभारती

## मराठी पुस्तक चौथे




१९७१

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ

पुणे

# प्रस्तावना

शासनमान्य अभ्यासक्रमानुसार पाठ्यपुस्तकांची निर्मिती व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाची स्थापना झालेली आहे. मंडळाने इयत्ता १ ते ७ पर्यंतच्या विविध विषयांच्या पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीचा कार्यक्रम आखलेला असून सदर पाठ्यपुस्तक त्यानुसार तयार केले आहे. ते तयार करताना शिक्षक, शिक्षणशास्त्रज्ञ आणि विविध शिक्षणसंस्था यांनी पाठवलेल्या सूचनांचा काळजीपूर्वक विचार करण्यात आला असून ते अधिकाधिक निर्दोष कसे करता येईल याकडे लक्ष पुरवण्यात आले आहे.

भारत सरकारने मान्य केलेल्या व महाराष्ट्र शासनाने स्वीकारलेल्या देवनागरी लिपीतील सुधारणा व जोडाक्षरपद्धती यांचा या पुस्तकाच्या मुद्रणात अवलंब केला आहे.

पुणे :
दि. २८ एप्रिल १९७०
वैशाख ८, १८९२

संचालक
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

प्रथमावृत्ती : १९७०
पुनर्मुद्रण : १९७१

इंडिया ऑफसेट प्रेस, नई दिल्ली-२७ [भारत] येथे छापले.



## प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत.

माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.

मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.

माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यांतच माझे सौख्य सामावले आहे.

# अनुक्रमणिका

# १. मनाचे श्लोक

मना सज्जना, भक्तिपंथेचि जावे
तरी श्रीहरी पाविजे तो स्वभावे ।
जनी निंद्य ते सर्व सोडोनि द्यावे
जनी वंद्य ते सर्वभावे करावे ॥

मना वासना दुष्ट कामा नये रे
मना सर्वथा पापबुद्धी नको रे ।
मना सर्वथा नीति सोडू नको हो
मना अंतरी सार-वीचार राहो ॥

मना श्रेष्ठ धारिष्ट जीवी धरावे
मना बोलणे नीच सोशीत जावे ।
स्वये सर्वदा नम्र-वाचे वदावे
मना सर्व लोकांसि रे नीववावे ॥

तनू त्यागिता कीर्ति मागे उरावी
मना सज्जना हेचि क्रीया धरावी ।
मना चंदनाचेपरी त्वा झिजावे
परी अंतरी सज्जना नीववावे ॥

मना सर्वथा सत्य सोडू नको रे
मना सर्वथा मिथ्य मांडू नको रे ।
मना सत्य ते सत्य वाचे वदावे
मना मिथ्य ते मिथ्य सोडोनि द्यावे ॥

—रामदास

अभ्यास :

१. रामदासांनी कोणकोणत्या गोष्टी करायला सांगितल्या आहेत ?
२. आपण कोणाप्रमाणे झिजावे ? का ?
३. उलट अर्थाचे शब्द लिहा : वंदन, नीती, दुर्जन, मिथ्य, नम्र.
४. खालील म्हणी सुरेख अक्षरांत लिहून वर्गात लावा :
तनू त्यागिता कीर्ति मागे उरावी. जनी वंदय ते सर्वभावे करावे.

# २. पक्ष्यांचा राजा — मोर

फळांचा राजा आंबा. फुलांचा राजा गुलाब. प्राण्यांचा राजा सिंह. तसा पक्ष्यांचा राजा कोण ?

कोणी म्हणेल की पोपट हा पक्ष्यांचा राजा. तो कसा सुंदर दिसतो अन किती गोड बोलतो ! पण पोपटापेक्षा सुंदर दिसणारे आणि पोपटाहून गोड बोलणारे कितीतरी पक्षी आहेत. ते का नाहीत मग पक्ष्यांचे राजे ?

कोणी म्हणेल की कोकिळ हा पक्ष्यांचा राजा असावा. तो गातो किती छान ! पण त्याचा रंग ? काळा कुळकुळीत !

मग गरुडाला करावा पक्ष्यांचा राजा ? तो किती उंच उंच उडतो. गरुडाने तर स्वर्गात जाऊन अमृत आणले होते म्हणतात. पण केवळ उंच उडता येते हा गुण का राजा व्हायला पुरेसा होईल ?

राजा कसा हवा ? रुबाबदार, दिमाखदार ! त्याचे कपडे कसे हवेत ? भारी भारी, जरीचे, रत्नेमाणके बसवलेले ! दुसऱ्या कोणाजवळ नसतील असे ! शिवाय राजा म्हटले की मुकुट हवा डोक्यावर. तोही रत्नजडित. राजाने एक पाऊल टाकले की सगळ्यांचे लक्ष त्याच्याकडे गेले पाहिजे. एकदा लक्ष गेले की डोळे त्याच्यावर खिळून राहायला हवेत.

असा कोणता पक्षी ? डोक्यावर मुकुट घातलेला, भरजरी पिसारा ल्यालेला. चालताना सगळ्यांचे लक्ष वेधून घेणारा ? तो मोर ! दुसरा कोण असणार ?

कसा असतो त्याच्या डोक्यावर तुरा ? शोभिवंत, ऐटबाज असा ! आणि त्याचा पिसारा ? जणू निळ्या मखमलीच्या अंगरख्यावर हिरे, पाचू जडवले आहेत ! पिसारा न फुलवतादेखील मोर चालू लागला की वाटते, त्या अंगरख्याचा लांबलचक घोळ त्याच्या मागून येतो आहे. त्याच्यावर पिंपळ-पानांची, डोळ्याडोळ्यांची नक्षी आहे ! राजाला करतात तसा मुजरा करावासा वाटतो मोराला.

पावसाळ्यात जेव्हा ढग दाटून येतात तेव्हा आभाळात ढगांचा पिसारा फुलतो. 'पाऊस येणार, येणार ' असे सांगत गार गार वारे वाहू लागतात. झाडेपाने डोलू लागतात. मग मोरही आपला लखलखीत पिसारा फुलवतो. वर चोच करून नाचू लागतो आणि ओरडतो, ' मियाँओ, मियाँओ'. एका कवितेत म्हटले आहे ते अगदी खरे वाटते. तीत म्हटले आहे—

मान उंच उभारून फोडिसी का टाहो ?
ढगांना का बोलाविसी या हो, या हो, या हो ?

"या आणि जसा माझा पिसारा फुलला आहे तसा या उन्हाळ्यात सुकलेल्या झाडांचा पिसारा फुलवा. माझ्या तुऱ्यासारखे गवताचे तुरे जिकडेतिकडे फुटू द्या. मी नाचतो आहे तशी पाने-फुले, पशु-पक्षी नाचू द्या. मेघांनो, या–हो, या–हो !"

असा नाचणारा मोर पाहायला मग मेघांची दाटी होते आणि पावसाची वृष्टी होते.

हा मोर पक्ष्यांचा राजा असला तरी तो आपला लहानपणापासूनचा दोस्त असतो. अगदी बाळाला बसतासुद्धा येत नसते तेव्हा आई त्याला आपल्या मांडीवर बसवते.



बाळाचा गोरागुबरा डावा तळहात पसरते. उजव्या हाताचे बोट उचलते आणि ते छोटेसे बोट त्या तळव्यावर नाचवत म्हणते—

इथं इथं बैस रे मोरा
बाळ घालतं चारा
चारा खा, पाणी पी
भूऽऽर उडून जा !

आई असे म्हणत असतानाच मोर आपला दोस्त बनून जातो. मग दिसते सावळ्या, हसऱ्या बाळकृष्णाच्या कुरळ्याकुरळ्या केसांत खोवलेले मोरपीस. ते मोरपीसही जणू आनंदाने हसत असते अन् आपल्याला हसवते. सरस्वतीच्या चित्रात, वासुदेवाच्या टोपीत, घरात लावलेल्या शोभिवंत पंख्यात—मोरपीस आपल्याला भेटतच असते. शाळेला गेलो की आपण कुठून ना कुठून एखादे मोराचे पीस मिळवतो. ते मऊमऊ पीस आपण हळूच गालावर फिरवतो. त्याच्यावर कुंकू टाकतो. आणि मोराचे पीस जर इतके सुंदर आहे, तर अशी शेकडो पिसे असलेला मोर किती सुंदर दिसत असेल अशा कल्पना करत बसतो.

आणि मग तो मोर आपल्याला एखाद्या बागेत, एखाद्या देवळात किंवा एखाद्या हौशी माणसाच्या अंगणात दिसतो. दूर प्रवासाला गेले तर एखाद्या झाडावरसुद्धा तो दिसतो. त्याच्याकडे पाहून आपले भान हरपते. "किती सुंदर आहे हा मोर ! खरा अगदी पक्ष्यांचा राजाच !" असे आपण पटकन म्हणून जातो.

मोर सर्वांगांनी सुंदर आहे पण त्याचे पाय मात्र लांबोडे, काटकुळे, वाळक्या पांढऱ्या काटक्यांसारखे. छे, छे, त्याच्या सुंदर तुऱ्याला, रंगीत पिसाऱ्याला ते पाय मुळीच शोभत नाहीत. पण मोराचे पाय भक्कम असतात. त्याच्या पायांना मागच्या बाजूला एकेक नखी असते. ती चांगली टोकदार असते. तिने तो आपल्या शत्रूंचा समाचार घेऊ शकतो. मोराची पिसे पळवायला जंगलातले लांडगे-कोल्हे आले, की मोर आपल्या भक्कम चोचीने त्यांचे डोळेच फोडतो किंवा त्यांच्या कपाळावर जखम करतो. सापाचेसुद्धा मोरापुढे काही चालत

नाही. मोर आपल्या चोचीने त्याला मारून टाकतो. तो राजाच जर आहे तर तो शूर असणारच !

जशी कावळा-कावळी, चिमणा-चिमणी, तशी मोर-लांडोर. लांडोर मोरापेक्षा लहान असते. तिला पिसारा नसतो. त्यामुळे ती कशीतरीच दिसते. मोर नाचायला लागला, की लांडोरही नाचते अन् मग तिला सगळे हसतात !

मोराला फारसे उंच उडता येत नाही. पण त्याच्या पिसाऱ्यामुळे तो थोडासा उडाला तरी त्याची भरारी छान दिसते.

असा हा मोर आपला लहानपणापासूनचा मित्र आहे. आपल्याबरोबर गाणारा, नाचणारा. पक्ष्यांचा राजा म्हणून मिरवणारा. आता तर आपण त्याचा राष्ट्रीय पक्षी म्हणून गौरव केला आहे.

आता जेव्हा जेव्हा ढग दाटून येतील, गार गार वारा सुटेल, झाडेपाने नाचू लागतील तेव्हा आपल्याला मोराची आठवण होईल. आपण नाचत नाचत व टाळ्या वाजवत त्याला म्हणू—

मोरा रे मोरा, बघ, वर बघ,
आकाशात आले काळे काळे ढग !
मोरा रे मोरा, एक पाय दुमडून
नाच तर खरा पिसारा उघडून !

असा आहे आपल्या भारताचा राष्ट्रीय पक्षी— सर्व पक्ष्यांचा राजा !

—सरिता पदकी

अभ्यास :

१. मोराची कुणाकुणाशी तुलना केली आहे ?
२. मोराला पक्ष्यांचा राजा का म्हणायचे ? ३. मोर आपल्या ओरडण्यातून काय सांगतो ?
४. श्री. ग. दि. माडगूळकर व श्रीमती शांता शेळके यांच्या 'नाच रे मोरा' व 'मोर' या कविता मिळवा आणि वाचा.
५. मोराबद्दल दहा वाक्ये लिहा. ६. मोराच्या पिसांचे रंगीत चित्र काढा.



# ३. सशाचे डोळे

तारकांचा राजा चंद्र हा एकदा आपल्या हरणाच्या रथात बसून नंदनवनात फिरायला गेला होता. तेथे त्याला एका गोकर्णीच्या वेलाखाली एक चिमुकला, पांढरा शुभ्र प्राणी दिसला. हिरवी हिरवी पाने आणि निळी निळी फुले यांच्या गर्दीत तो गोजिरवाणा प्राणी पिंजलेल्या कापसाच्या राशीसारखा दिसत होता. त्याचे उभारलेले कान पांढऱ्या चाफ्याच्या पाकळ्यांसारखे वाटत होते. आपल्या मागल्या पायांवर उभा राहून तो गोकर्णीची कोवळी कोवळी पाने लुबूलुबू खात होता.

तो गोजिरवाणा प्राणी म्हणजे ससा होता.

चंद्राला तो ससा पाहून गंमत वाटली. तो आपला रथ थांबवून हळूच खाली उतरला व पाने खाण्यात गर्क असलेल्या त्या सशाला त्याने अलगद धरले. ससा म्हणजे मुलखाचा भित्रा; पण चंद्राच्या हातांचा स्पर्श सशाला इतका काही

आवडला, की त्यांतून सुटून जाण्याची धडपड न करता तो उलट त्याचे हात चाटायला लागला. चंद्राने त्याला कुरवाळून छातीशी धरले. हळूहळू चंद्राला त्याचा इतका काही लळा लागला, की आकाशातून सहल करताना तो नेहमी सशाला आपल्याबरोबर नेऊ लागला.

चंद्राने सशाला जवळ घेतले म्हणजे त्याच्या प्रकाशात सशाचे पांढरे शुभ्र शरीर हिऱ्यासारखे चमकत असे व त्याचे निळेकाळे डोळे इतके लखलखत, की आभाळातल्या साऱ्या तारकांचे तेज त्याच्यापुढे फिके पडत असे. त्यामुळे सारे जग त्याच्याकडे कौतुकाने बघू लागले. त्याचा सशाला गर्व झाला. त्याला असे वाटू लागले, की नंदनवनातली फुले, आकाशगंगेतली कमळे किंवा चंद्राभोवतालची नक्षत्रे यांचे सौंदर्य आपल्यापुढे काहीच नाही. फार काय, त्याचा हळूहळू असाही समज झाला, की चंद्र आकाशात फिरायला लागला, की साऱ्या पृथ्वीवर जो प्रकाश पडतो, तो म्हणजे खरोखरच आपल्या स्वतःच्या सौंदर्याचेच तेज होय.

चंद्राच्या रथाला जो हरीण जोडला जात असे, त्याची आणि सशाची चुरस



सुरू झाली. ससा दृष्टीस पडण्यापूर्वी चंद्राला त्या हरणाचा अतिशय लळा होता. पुष्कळदा त्याला प्रेमाने आपल्या छातीशी धरून चंद्र आकाशात फिरायला निघत असे. पण चंद्राने ससा बाळगल्यापासून हरणाला एकदाही आपल्या धन्याच्या छातीवर डोके टेकण्याची संधी मिळाली नाही. सदान्‌कदा ससा आपल्या धन्याच्या छातीवर रेललेला असायचा. त्यामुळे हरणाला सशाचा राग येऊ लागला. त्याला वाटे, की आपण धन्याचा रथ ओढून त्याची एवढी चाकरी बजावतो; पण आपल्या अंगावरून त्याचा कधी मायेने हात फिरेल तर शपथ! आणि काही काम न करणारा हा ऐतखाऊ ससा मात्र अष्टौप्रहर धन्याच्या अंगावर लोळत असतो! त्याचा पांढरा रंग सुंदर असला, तरी आपला तपकिरी रंग काही कमी सुंदर नाही व आपले काळेभोर टपोरे डोळे तर त्याच्या त्या लुकलुकणाऱ्या लहानशा डोळ्यांपेक्षा कितीतरी सुंदर आहेत!

सशाला गोकर्णीची पाने फार आवडत असत. तिच्या वेलाला आपल्याशिवाय दुसऱ्या कोणीही तोंड लावलेले त्याला खपत नसे. एक दिवस असे झाले, की धन्याला खूप हिंडवून परत आल्यावर भुकेलेला हरीण त्या वेलाजवळ जाऊन त्याची पाने खाऊ लागला. त्याबरोबर आपले दोन्ही कान उभारून आणि मागल्या पायांवर उभा राहून ससा तावातावाने त्याला म्हणाला, "या गोकर्णीची पानं तू का खातोस? ही गोकर्णी माझी आहे."

भुकेल्या हरणाला त्याच्या त्या बोलण्याची चीड आली. तो संतापाने उद्‌गारला, "तुला कोणी दिली रे ही गोकर्णी? ऐतखाऊ! मी सारा दिवस धन्याचा रथ ओढून दमतो अन्‌ तू मला सुखानं चार पानंसुद्‌धा खाऊ देत नाहीस—"

हरणाने आपल्याला ऐतखाऊ म्हटले याचा सशाला विलक्षण राग आला. दोघांचे कडाक्याचे भांडण जुंपले. शेवटी ससा म्हणाला, "तुझ्याहून मी किती श्रेष्ठ आहे, हे सारं जग जाणतय. लोक ज्याला चांदणं म्हणतात, ते माझ्या शुभ्र शरीराचं तेज आहे, समजलास?"

हे सिद्‌ध करण्याचे आव्हान हरणाने सशाला दिले. दोघे चंद्राकडे गेले. सशाची ती बढाई ऐकताच चंद्र फार रागावला. त्याला दूर ढकलून तो

म्हणाला, "चल, चालता हो! पृथ्वीवर जा अन् पाड आपल्या तेजाचा प्रकाश हवा तितका!"

ससा रडकुंडीला आला आणि गयावया करू लागला.

अखेर चंद्राला त्याची दया आली व त्याने म्हटले, "मी आता काही झालं तरी तुला पूर्वीसारखा सदोदित माझ्या अंगावर वागवणार नाही. फारतर पौर्णिमेच्या रात्री काही वेळ तुला छातीशी धरीन. तू चालता हो इथून—"

सर्वांच्या समोर झालेल्या आपल्या अपमानाचे आणि अधःपाताचे सशाला अतिशय दुःख झाले. आपली चुगली करणाऱ्या हरणाचा तर त्याला भयंकर



संताप आला. त्या दुःखसंतापाने त्याचे ते निळेकाळे डोळे एकदम लालभडक होऊन गेले व त्या वेळी ते एकदा जे लाल झाले ते कायमचेच!

तेव्हापासून फक्त पौर्णिमेच्या रात्री मात्र चंद्रोदयाच्या वेळी ससा चंद्राच्या छातीवर रेललेला दृष्टीस पडतो.

—ग. त्र्यं. माडखोलकर

**अभ्यास :**

१. चंद्राला ससा कुठे दिसला व तो काय करत होता? २. चंद्राला ससा का आवडला? ३. सशाला स्वतःसंबंधी काय वाटू लागले? ४. हरणाला सशाचा राग का येऊ लागला? ५. ससा व हरीण यांचे भांडण जुंपण्याला काय निमित्त घडले? ६. चंद्र सशावर का रागावला? ७. सशाचे डोळे लाल का झाले? ८. पौर्णिमेच्या रात्री चंद्रोदयाच्या वेळी ससा चंद्राच्या छातीवर रेललेला दिसतो म्हणजे काय?



# ४. या बालांनो

[एक पुंगीवाला जादूगार एका नगरातील मुलांना दुसऱ्या अद्‌भुत सृष्टीत बोलावत आहे.]

या बालांनो, या रे या!
लवकर भरभर सारे या!
मजा करा रे! मजा करा!
आज दिवस तुमचा समजा.

स्वस्थ बसे
तोचि फसे!
नवभूमी
दाविन मी,

या नगराला लागुनिया
सुंदर ती दुसरी दुनिया!
या बालांनो, या रे या!
लवकर भरभर सारे या!





खळखळ मंजुळ गाति झरे,
गीत मधुर चहुबाजु भरे !
जिकडे तिकडे फुले फळे,
सुवास पसरे, रसहि गळे !
पर ज्यांचे
सोन्याचे
ते रावे
हेरावे
तर मग कामे टाकुनिया
नवी बघा या, ही दुनिया !
या बालांनो, या रे या !
लवकर भरभर सारे या !

पंख पाचुचे मोरांना,
टिपति पाखरे मोत्यांना,
पंख फडकती घोड्यांना,
मौज दिसे ही थोड्यांना.
चपलगती
हरिण किती !
देखावे
देखावे
तर मग लवकर धावुनिया
नवी बघा या, ही दुनिया !
या बालांनो, या रे या !
लवकर भरभर सारे या !

—भा. रा. तांबे

अभ्यास :

१. पुंगीवाला मुलांना कशासाठी बोलवित आहे ?
२. या कवितेत नव्या दुनियेतील कोणकोणत्या गोष्टींचे वर्णन केले आहे ?
३. पोपट, मोर, घोडे व हरीण यांच्याबद्दल कवितेत काय काय सांगितले आहे ?
४. 'स्वस्थ बसे तोचि फसे' असे का म्हटले आहे ?

# ५. लालबहादूर शास्त्री

गंगेच्या काठी मोगलसराय नावाचे गाव आहे. या गावी एका गरीब घराण्यात २ ऑक्टोबर, १९०४ रोजी लालबहादूरचा जन्म झाला. त्याच्या वडिलांचे नाव होते शारदाप्रसाद आणि आईचे नाव होते रामदुलारीदेवी. लालबहादूर हा त्यांचा एकुलता एक लाडका मुलगा होता. तो सर्वांना आवडे. लहानपणी तो अशक्त व लाजाळू होता. त्याची छोटी मूर्ती पाहून सारे जण त्याला 'नन्हे' म्हणत.

नन्हे दोन वर्षांचा झाला तेव्हा त्याचे वडील अचानक वारले. त्याच्या आईबरोबर तो आपल्या आजोळी आला. आजोबांच्या घरी तो वाढू लागला. शाळेत जाऊ लागला. मित्रांबरोबर तो गंगेवर जाई, पाण्यात डुंबे आणि घरी येताना पूजेसाठी फुले आणी. त्याचा स्वभाव शांत, मनमिळाऊ होता. तो कधी कुणाशी भांडत नसे. अभ्यास करायचा आणि मोठे होऊन आईला सुखी करायचे असे त्याने ठरवले होते.

दहाव्या वर्षी छोटा लालबहादूर वळकटी पाठीशी बांधून काशीला निघाला. शिकण्यासाठी बाळ दूर निघाला तेव्हा आईचे डोळे भरून आले. मुलाच्या पाठीवरून तिने हात फिरवला व ती म्हणाली, "बेटा लाल, मावशीच्या घरी नीट वाग हं. आपण गरीब आहोत. मन लावून अभ्यास कर. चांगलं नाव मिळव."

लालबहादूर विद्यालयात शिकू लागला. त्याने कितीतरी मित्र जोडले. गुरुजींच्या म्हणण्याप्रमाणे तो वागू लागला. तो खूप वाचत असे, खूप खेळत असे. पोहण्यातही तो अगदी पटाईत झाला. शाळेच्या मधल्या सुट्टीत त्याचे श्रीमंत मित्र मेवामिठाई विकत घेऊन खात असत. लालबहादूरच्या तोंडाला अशा वेळी पाणी सुटे. पण तो अत्यंत स्वाभिमानी होता. कुणी खायला दिले तरी तो खोटेच सांगे, 'मला भूक नाही, मी घरून पोटभर जेवून आलो आहे.'

शाळेत असताना लालबहादूर अगदी साधेपणाने व काटकसरीने वागे.



आपले कपडे आपणच धूत असे. चपला फाटल्या तर त्याच दुरुस्त करून वापरी. कधी कधी तर त्याला अनवाणी शाळेत जावे लागे. त्याच्याइतका स्वाभिमानी व प्रामाणिक मुलगा शाळेत दुसरा कोणी नव्हता.

एकदा तो गंगेच्या पलीकडे जत्रेला गेला. परत यायला सायंकाळ झाली. त्याचे मित्र नावेत बसून अलीकडच्या तीरावर आले. पण लालबहादूर मात्र अद्यापि परतला नव्हता. साऱ्यांना काळजी वाटू लागली. थोड्या वेळाने त्यांना एक मुलगा पोहत येताना दिसला. तो लालबहादूर होता. नावाड्याला देण्यासाठी पैसे नव्हते म्हणून तो गुपचूप पोहत आला.

लालबहादूर मॅट्रिकच्या वर्गात गेला त्या वेळी देशभर स्वातंत्र्याची चळवळ

चालू होती. सभा भरत होत्या. मिरवणुका निघत होत्या. 'भारतमाता की जय' अशा घोषणा होत होत्या. हजारो सत्याग्रही तुरुंगात डांबले जात होते. लालबहादूरने एकदा गांधीजींचे भाषण ऐकले आणि तेव्हापासून तोही देशसेवा करू लागला. त्याने सत्याग्रहात भाग घेतला. तो खादीचे कपडे वापरू लागला. स्वातंत्र्यासाठी तो अनेकदा तुरुंगात गेला. जवाहरलाल नेहरूंचा तो आवडता शिष्य बनला. त्याने देशसेवा तर केलीच, पण शिक्षणाकडे दुर्लक्ष केले नाही. काशी विद्यापीठात शिकून त्याने 'शास्त्री' ही पदवी मिळवली. लोक त्यांना शास्त्री नावानेच ओळखू लागले.

१९४७ साली आपला देश स्वतंत्र झाला. देशभर आपली मंत्रिमंडळे कारभार करू लागली. शास्त्री प्रथम उत्तर प्रदेशात मंत्री झाले. त्यांचा त्याग, कष्ट, प्रामाणिकपणा हे गुण सर्वांच्या नजरेत भरले. नेहरूंनी त्यांना दिल्लीला बोलावले. शास्त्री प्रथम भारताचे रेल्वेमंत्री होते. पुढे ते गृहमंत्री झाले. पंडित नेहरूंच्या नंतर ते पंतप्रधान झाले. त्यांच्या हाती मोठा अधिकार आला, पैसा आला, पण त्यांची साधी राहणी व नम्र, शांत स्वभाव ही कधी बदलली नाहीत. सर्वांशी मैत्री जोडून देशाची प्रगती करायची हे त्यांचे ध्येय होते. अठरा महिने ते पंतप्रधान होते. या काळात देशावर अनेक संकटे आली. पाकिस्तानने भारतावर आक्रमण केले. मेणाहून मऊ असणारे शास्त्री या वेळी वज्रासारखे कठीण झाले. जवानांना, किसानांना त्यांनी हाक दिली, आक्रमण परतवून लावले. 'जय जवान, जय किसान!' ही शास्त्रीजींनी दिलेली घोषणा होय. भारत-पाक मैत्रीसाठी शास्त्रीजी ताश्कंदला गेले. तेथल्या वाटाघाटीत यश घेऊन ते परतणार होते; त्यापूर्वी तिथेच ते पण. अचानक निधन पावले. तो दुर्दैवी दिवस म्हणजे ११ जानेवारी, १९६६. त्यांच्या निधनामुळे सारा देश हळहळला. सारे जग हळहळले. एकी, शांती आणि प्रगती हा शास्त्रीजींचा मंत्र होता. तो देऊन ते देवाघरी गेले.

मूर्ती छोटी, पण कीर्ती मात्र किती मोठी!

—म. श्री. दीक्षित

**अभ्यास :**

१. लालबहादुरांचे शिक्षण कुठे झाले? त्यांना शास्त्री का म्हणत असत?

२. लालबहादुरांचे कोणकोणते गुण या पाठात वर्णन केले आहेत?

३. लालबहादुरांच्या जीवनातील कोणता विशेष प्रसंग या पाठात सांगितला आहे? तो पाच वाक्यांत लिहा.

४. 'मूर्ती छोटी, पण कीर्ती मात्र किती मोठी' असे का म्हटले आहे?

५. त्यांना मानाच्या कोणकोणत्या जागा मिळाल्या? त्यांचा त्यांच्या राहणीवर काय परिणाम झाला?

६. वाक्ये पुरी करा :

(अ) ········ मऊ असणारे शास्त्री ········ कठीण झाले.

(आ) हाती ········ अधिकार आला पण ········ राहणी व ········ स्वभाव बदलला नाही.

(इ) 'जयं ········, जय ········!' ही घोषणा त्यांनी दिली.

**व्याकरण :**

(१) एकदा तो गंगेच्या पलीकडे

(२) तो गुपचूप

तो गंगेच्या पलीकडे का गेला? गुपचूप काय केले? काहीच कळत नाही.

आता हे वाचा :

(३) एकदा तो गंगेच्या पलीकडे जत्रेला गेला.

(४) तो गुपचूप पोहत आला.

(३) व (४) यांत लालबहादूर शास्त्रीसंबंधी काही गोष्टी सांगितल्या आहेत. त्या आपणांस कळतात.

(३) व (४) या शब्दसमूहांचा अर्थ कळतो. अशा शब्दसमूहांस 'वाक्य' म्हणतात. (१) व (२) या शब्दसमूहांचा अर्थ नीट समजत नाही. अशा शब्दसमूहांना 'वाक्य' म्हणता येणार नाही. पूर्ण अर्थाच्या बोलण्यास किंवा लिहिण्यास 'वाक्य' म्हणतात.

## ६. पाळण्यातले पाय

एका नदीच्या काठी एक लहानसे घर होते. त्या घरात एक छोटासा मुलगा आणि त्याची म्हातारी आजी राहात होती. मुलगा मोठा चतुर आणि बोलका होता. तो दिवसभर आपल्या म्हाताऱ्या आजीला 'हेच का? तेच का? असेच का? तसेच का?' असे नाना प्रश्न विचारून भंडावून सोडी. रोज आजूबाजूला दिसणाऱ्या गोष्टी, होणाऱ्या घडामोडी या साऱ्यांबद्दलचे एक विशेष कुतूहल या मुलामध्ये जागे होई; म्हणूनच पाऊस पडू लागला की हा विचारी, "आजी, हे पाणी कुठून येतं ग?"

जोरदार वाऱ्याने घराच्या खिडक्या वाजू लागल्या की हा विचारी, 'आजी, वारा कुठं राहतो ग?"

नदीत टाकलेला कागदाचा कपटा, चिंधी, गवताची काडी पाण्याबरोबर चाललेली पाहिली, की हा विचारी, "आजी, नदीच्या पाण्याबरोबर हे पदार्थ वाहात का जातात?" म्हातारी आजी सांगता येईल तेवढे त्याला सांगे. पण कधी कधी तिलाही माहीत नसे, अशा वेळी ती तरी काय सांगणार त्याला? मग काहीतरी सांगून ती वेळ मारून नेई, तर कधी गप्प बसून राही.

पण ह्या मुलाला मात्र चैन पडत नसे. त्याच्या शंकेचे बरोबर उत्तर मिळाल्याशिवाय त्याला समाधान लाभत नसे. त्यासाठी तो मग शेजाऱ्या-पाजाऱ्यांकडे जाऊनही प्रश्न विचारीत बसे. कधी तासन्‌तास आभाळाकडे टक लावून बसे. तर कधी नदीकिनारी तहानभूक विसरून जाई!

एके दिवशी तो असाच खडकावर नदीच्या पाण्यात पाय सोडून बसला होता. घरात म्हातारी आजी जात्यावर धान्य दळत होती. जात्याचा घर्र् घर्र् आवाज ऐकू येत होता. मुलाचे कान त्या फिरत्या जात्याच्या आवाजाकडे नि डोळे वाहत्या पाण्याकडे होते. चटकन त्याच्या मनात आले—'हे पाणी दगड-गोट्यांनाही आपल्याबरोबर वाहून नेत आहे! एवढी शक्ती जर या वाहत्या पाण्यात आहे तर मग याच्याकडून आणखी काही काम का करून घेऊ नये?'

ठरलेच. मनाशी निर्णय पक्का झाला. तो उठला; घरी गेला. त्याने आपली पुरचुंडी काढली. आजीने वेळोवेळी खाऊसाठी दिलेले पैसे काटकसरीने खर्च करून त्याने ही पुंजी जमा केली होती. त्या पैशातून त्याने काही वस्तू खरेदी केल्या. नदीकिनारी खडकावर बसूनच त्याने एक चक्र तयार केले. ते चक्र त्याने एका सळईला जोडले. पाण्याच्या जोराने सळई फिरेल अशा रीतीने ती त्याने प्रवाहाजवळ बसवली. पाण्याच्या प्रवाहाने सळई फिरू लागली, तसे चक्रही फिरू लागले!



फिरते चक्र पाहून त्या मुलाला एवढा आनंद झाला, की तो धावत-धावतच घरी आजीकडे गेला आणि म्हणाला, "आजी, आजी, माझे फिरते चक्र पाहायला चल!"

आजी त्याच्याबरोबर गेली; पण तेवढ्यात त्याच्या मित्रांनी चक्र मोडूनतोडून टाकले होते. कारण तो एकटाच काहीतरी करत बसलेला पाहून ते त्याच्यावर चिडलेले होते. तो राग त्यांनी असा काढला होता. तिथे काहीच नाही हे पाहून आजीलाही मुलाचा राग आला.

त्याचे असले तऱ्हेवाईक बोलणे नि वागणे तिलाही पसंत नव्हते. शेवटी मुलाने नीट शिकावेसवरावे म्हणून तिने त्याला दुसऱ्या एका गावच्या शाळेत ठेवले.

एकदा काय झाले, वर्गात गुरुजी धडा समजावून देत होते. पण हा मुलगा मात्र खिडकीतून बाहेर बघण्यात दंग झाला होता. त्याचे धड्याकडे काही लक्ष नव्हते. हे पाहून गुरुजींना राग आला. त्यांनी रागानेच विचारले, "बाहेर काय बघतोस?"

मुलाने उत्तर दिले, "गुरुजी, ते पाहा, ढग कसे धावताहेत आभाळात! हवेत केवढी शक्ती आहे नाही? पाहा, पाहा ढगांना कशी पळवत नेत आहे ती! हवेत जर एवढी शक्ती आहे तर तिचा उपयोग का नाही करून घेतला जात?"

"सांग हवेला हात वर करून, म्हणजे तुलाच ती उडवून नेईल!" गुरुजी म्हणाले. सारा वर्ग खो खो हसू लागला. सगळी मुले त्याची चेष्टामस्करी करू लागली. त्यांनी त्याचे नावच ठेवून टाकले—'का राव?' आणि 'कसं राव?'

पण त्या मुलाने आपला छंद काही सोडला नाही. त्याचे विचारचक्र फिरतच राहिले. त्याच वेळी गावाबाहेरच्या डोंगराजवळ एक प्रचंड पवनचक्की बसवण्यात येणार आहे असे त्याला कळले. ही बातमी कळताच हा मुलगा ताबडतोब तिकडे गेला. पाहतो तो खरेच काही मजूर पवनचक्कीचे मोठमोठे पंख तिथे बसवत होते. त्याला फार आनंद झाला; त्याचे औत्सुक्य वाढले. त्याने त्या मजुरांना कितीतरी प्रश्न विचारले–'हे काय नि ते काय? असं का नि तसं का?'

तिथेच त्याच्या एका मित्राचे वडील होते. या मुलाची उत्सुकता पाहून त्यांना कौतुक वाटले. त्यांनी या मुलाला पवनचक्कीसंबंधीची सर्व माहिती समजावून दिली. ही माहिती मिळताच त्याला वाटू लागले, की ही मोठी पवनचक्की तयार होण्याच्या आत आपण लहान पवनचक्की तयार करावी!

मनात येताच स्वारी त्याच कामाला लागली. आवश्यक वस्तू जमवल्या आणि बऱ्याच खटाटोपानंतर त्याने पवनचक्की तयार केली. मोठी पवनचक्की तयार होण्याच्या आत याची छोटी पवनचक्की फिरायलाही लागली!

या मुलाचे हे कर्तृत्व पाहून लोकांनीही त्याची तारीफ केली; त्याला शाबासकी दिली. पण या मुलाचे समाधान एवढ्याने कुठले व्हायला? तो विचारमग्नच होता. आपल्या तंद्रीतच होता.

एका मित्राने विचारले, "आता रे कसला विचार करतोयस?"

तो म्हणाला, "ही पवनचक्की फिरते आहे ती हवेच्या जोरावर. पण भिंतीमुळे पुरेशी हवा घरात येत नाही म्हणून व्हावे तेवढे काम होत नाही."

तेवढ्यात एक पिटुकला उंदीर तिथून पळाला. पळताना त्याच्या धक्क्याने ती छोटी पवनचक्की फिरली. ते पाहून त्याला चटकन युक्ती सुचली. त्याने एक लहानसा डबा तयार केला. एक खिळा ठोकून तो पवनचक्कीला जोडला. मग एक मोठा उंदीर पकडून त्या डब्यात बंद करून ठेवला. डब्यातला उंदीर बाहेर पडण्यासाठी जोरजोराने डब्यातल्या डब्यात फिरू लागला. त्या उंदराबरोबर डबाही फिरायला लागला आणि त्याबरोबर पवनचक्कीही फिरायला लागली.

आता मात्र त्या मुलाला खराखुरा आनंद झाला. त्याने घेतलेल्या कष्टाचे, श्रमाचे फळ त्याला मिळाले होते. त्याच सुमारास त्याची आजी त्याला भेटायला म्हणून तिथे आली. तिने आपल्या मुलाबद्दल गुरुजींकडे चौकशी केली तेव्हा ते म्हणाले, "मुलाचे पाय पाळण्यात दिसतात. आपला मुलगा मोठा वैज्ञानिक म्हणून नाव मिळवील."

गुरुजींची ही भविष्यवाणी पुढे खरी ठरली. हाच मुलगा पुढे 'ऐझॅक न्यूटन' या नावाने महान संशोधक म्हणून अमर झाला. यानेच झाडावरून खाली पडणारे फळ पाहून पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणशक्तीचा शोध लावला. आधुनिक विज्ञानाला न्यूटनने ही मोठीच देणगी दिली.

—राजा मंगळवेढेकर

अभ्यास :

१. ऐझॅक न्यूटन लहानपणी मोठा चौकस होता, हे कोणकोणत्या प्रसंगांवरून दिसते?
२. नदीच्या पाण्यात तो पाय सोडून बसला असता त्याच्या मनात कोणते विचार आले? ते अमलात आणण्यासाठी त्याने कोणते प्रयत्न केले? त्याच्या प्रयत्नाचे कोणते फळ त्याला मिळाले?
३. शाळेत गुरुजी न्यूटनवर का रागावले? मुलांनी त्याची चेष्टा का केली? या गोष्टींचा न्यूटनवर काय परिणाम झाला?
४. 'आपला मुलगा मोठा वैज्ञानिक म्हणून नाव मिळवील', असे गुरुजी का म्हणाले?
५. श्री. म. माटे यांचे 'बारा शास्त्रज्ञ' हे पुस्तक मिळवून वाचा.



# ७. लाडकी बाहुली

लाडकी बाहुली होती माझी एक
मिळणार तशी ना, शोधुन दुसऱ्या लाख !

किति गोरी गोरी, गाल गुलाबच फुलले
हासती केस ते सुंदर काळे कुरळे
झाकती, उघडती निळे हासरे डोळे
अन् ओठ जसे की, अताच खुदकन हसले
अंगात शोभला झगा रेशमी लाल
केसांवर फुलले लाल फितीचे फूल
कितितरी बाहुल्या होत्या माझ्याजवळी
पण तीच सोनुली फार मला आवडली !

मी तिजसह गेले माळावर खेळाया
मी लपुनी म्हणते, 'साइसुट्य हो ! या, या !'
किति शोधशोधली कुठे न परि ती दिसली
परतले घरी मी होउन हिरमुसलेली !
वाटले सारखे जावे त्याच ठिकाणी
शोधुनी पहावी पुन्हा पुन्हा ती चिमणी
जाणार कशी पण ? संतत पाउस-धार !
खळ मुळी न तिजला, वारा झोंबे फार





तिजसाठी रडले रात्रंदिन मी बाई
किति खेळ भोवती, हात लावला नाही!
स्वप्नात तिने मम रोज एकदा यावे
हलवून मला हळु माळावरती न्यावे
पाऊस उघडता गेले माळावरती
गवतावर ओल्या मजला सापडली ती!
कुणि गेली होती गाय तुडवुनी तिजला
पाहून दशा ती—रडूच आले मजला.

मैत्रिणी म्हणाल्या, 'काय अहा, हे ध्यान!
केसांच्या झिपऱ्या — रंगहि गेला उडुन!'
पण आवडली ती तशीच मजला राणी
लाडकी बाहुली माझी—माझी म्हणुनी!

—इंदिरा संत

अभ्यास :

१. ही बाहुली मुलीची लाडकी का झाली?
२. बाहुलीला घेऊन ती कुठे गेली होती? तिथून ती हिरमुसली होऊन परत का आली?
३. लाडक्या बाहुलीबद्दल त्या मुलीला काय काय वाटत होते?
४. बाहुली सापडल्यावरही मुलीला रडू का आले?
५. तुम्ही पाहिलेल्या एका सुंदर बाहुलीचे वर्णन करा.



# ८. जीत

माळ माणसांनी भरून गेला होता. बघावे तिकडे माणूस होते. आसपासच्या चार गावचे लोक शर्यत बघायला माळावर गोळा झाले होते.

वेळ होत आली तशी एकेक गाडी येऊन उभी राहू लागली. गावच्या तुका पाटलाचीही गाडी येऊन उभी राहिली. तसे गाडीभोवती गराडा घालून लोक उभे राहिले, खुळ्यासारखे गाडीकडे बघत राहिले.

तुकाने आपला म्हातारा हण्र्या बैल गाडीला जोडला होता. जोडीच्या तरण्या खिलारी खोंडाबरोबर हण्र्या उभा होता आणि लोक टक लावून त्याच्याकडे बघत राहिले होते. ऐन उमेदीत हण्र्याने शर्यती जिंकल्या होत्या हे लोकांना माहीत होते. त्याचे गुण सगळ्यांना माहीत होते. साऱ्या गावात तो नावाजलेला बैल होता हे खरे, पण आता त्याचे वय झाले होते. अंगात दम नव्हता, अंगावर धड मास नव्हते, त्याची हाडे दिसत होती. बैल पार थकला होता आणि तोंडावर तजेला नव्हता. जोडीच्या खिलारी खोंडाबरोबर तो कसा पळणार हीच चिंता लोकांना पडली होती आणि सारे लोक मनातून तुका पाटलाला

शिव्या देत उभे होते. त्या खुळ्याने म्हाताऱ्या बैलाला का जोडावे, हेच त्यांना कळत नव्हते.

हळूहळू सगळ्या गाड्या येऊन उभ्या राहिल्या. कुणाची जोडी जागच्या जागी नाचत होती. कुणाचे खोंड डिरक्या फोडत होते. कुणी गर्दन वाकवून शिंगे लावत होते तर कुणी पायाने खालची जमीन उकरत होते. हण्र्याचा जोडीदारही गप उभा राहात नव्हता, पण सारे लोक हण्र्याकडे बघत उभे होते. हण्र्याचे पळणे त्यांना ठाऊक होते. त्याची चलाखी साऱ्यांना माहीत होती. उभ्या गाडीला तो कधी थयथय नाचायचा नाही. डिरकी टाकायचा नाही. शिंगे हलवायचा नाही. पण एकदा गाड्या सुटल्या आणि चाके खडाडली म्हणजे त्याचा पाय जमिनीवर ठरत नसे. चाके वाजतील तसा तो उसळी घेत जायचा. त्याला कधी उसकावे लागायचे नाही—मारावे लागायचे नाही. तशीच वेळ आली तर जोडीच्या बैलालाही गुंडाळून घेऊन तो एकटाच धावायचा.

हण्र्या असा धावायचा हे खरे, पण आता त्याचे वय झाले होते. बाजाराला, जत्रेला जाताना एखादी चुणूक दाखवणे निराळे आणि शर्यतीचे काम निराळे. हे काम आता कसे काय झेपणार ही चिंता लोकांना लागली होती आणि तुका निश्चिंत होता. हण्र्या म्हातारा झाला असला तरी त्याच्यावर त्याचा भरवसा होता. लोक काळजीने त्याच्या गाडीकडे बघत होते आणि तुका खुशाल हसऱ्या चेहऱ्याने त्यांच्याकडे बघत होता.

इशारा झाला. गाड्या उधळल्या. चाके खडाडली. हण्र्याच्या कानात वारे शिरले आणि कळा खाणारा म्हातारा बैल उमद्या घोड्यागत लांबलचक उडी घेऊ लागला. त्याचा पाय जमिनीला ठरेनासा झाला. जोडीचा खिलारी खोंड मागे पडू लागला. बघता बघता गाड्यांमागून गाड्या तोडल्या जाऊ लागल्या. एक वावटळ सुटल्यागत गाडी पुढे जाऊ लागली. बाकीचे गाडीवान पालथे पडून बैलांना हाणू लागले आणि सारे लोक खुळे होऊन बघत राहिले.

गाड्या लांब जाऊन दिसेनाशा झाल्या; तसे हण्र्याविषयीचे बोलणे सुरू झाले. गाड्या मागे फिरण्याची वेळ भरत आली तसा सगळा माळ टाचा वर करून



बघत उभा राहिला. झाडांचे शेंडेही माणसांनी फुलून गेले. लांबून आवाज कानावर येऊ लागला आणि डगरींवर, झाडांवर चढून लोक बघू लागले. तोच एका झाडावरून कोणीतरी ओरडले, म्हाताऱ्या बैलाचीच गाडी आली, गाडी आली !

माणसे माळावर पळून खेळू लागली. लोकांना दम निघेनासा झाला. हण्र्याला बघायला सारे पुढे पळू लागले तोवर तुका पाटलाची गाडी जवळ आली. दोनतीन गाड्या सारख्या घासून येत होत्या. सारखी झणापण सुरू झाली. बैल फेसळून गेले होते. चाके खडाडत होती आणि हण्र्या सारखा घोड्यागत धावत होता. कुणाचीच गाडी मागून जवळ येऊ देत नव्हता. सीमा जवळ आली, तसा त्याच्या तोंडातून फेस खाली गळत होता. पुढच्या दोन्ही पायांवर त्याची धार सारखी लोंबत होती. तरीही त्याला आपल्या जिवाची पर्वा नव्हती. मागच्या गाडीचे चाक वाजेल तसा तो पुढे उडी घेत होता.

त्या तावातच गाडी सीमारेषा ओलांडून दोन कासरे पुढे गेली आणि पाठोपाठ धावत गेलेल्या माणसांनी गाडीभोवती गराडा घातला. पालये पडून लोक हण्र्याला बघत राहिले.

—शंकर पाटील

डिरकी टाकणे–खोंडाचे ओरडणे, गर्दन–मान.



**अभ्यास :**

१. शर्यत कशाची होती ? ती कुणी जिंकली ?

२. शर्यत सुरू होण्यापूर्वी लोकांचे कुणाकडे विशेष लक्ष होते ? का ?

३. शर्यतीचा शेवट काय झाला ?

४. हर्ण्याचे वर्णन करणारी वाक्ये शोधून काढा. त्यांचा उपयोग करून हर्ण्यासंबंधी एक परिच्छेद लिहा.

५. पाय जमिनीवर न ठरणे, गराडा घालणे, कानात वारे शिरणे, चुणूक दाखवणे या शब्दसमूहांचे अर्थ सांगा.

**व्याकरण :**

१. खालील शब्दसमूहांपैकी वाक्ये कोणती ते ओळखा. वाक्ये नसलेल्या शब्द-समूहांचा उपयोग करून वाक्ये लिहा :

(अ) सारे लोक हर्ण्याकडे बघत उभे होते.

(आ) डांबले जात होते.

(इ) लांब जाऊन दिसेनाशा झाल्या.

२. खाली काही शब्दसमूह दिले आहेत. रिकाम्या जागी आवश्यक तेवढे शब्द लिहा व वाक्ये तयार करा :

(अ) ............ घराच्या दारात उभी होती. (आ) सगळीकडे पाणीच पाणी ............ होते. (इ) कबड्डीचा ............ सुरू होता. (ई) मोर ............

# ९. त्यांचे सोने झाले

फायरमन चमनलाल हे काही लष्करात काम करीत नव्हते. ते भारतीय रेल्वेचे एक साधेसुधे फायरमन होते. नेहमी शेकडो मैलांचा प्रवास करून दमून भागून चमनलाल घरी यायचे. त्यांची पत्नी व दोन मुले मोठ्या आतुरतेने त्यांची वाट पाहात असत. ते घरी येताच मुले 'बाबा आले, बाबा आले' म्हणून ओरडत, नाचत. ते राहणारे पंजाबचे. याच प्रदेशावर पाकिस्तानी सैनिकांनी जोराचा हल्ला चढवला होता. हल्ला परतवून लावण्यासाठी जो तो आपले प्राण पणाला लावत होता.

जवान आघाडीवर लढत होते. मोठ्या हिमतीने शत्रूचा हल्ला परतवत होते. त्यांना मोटार, रणगाडे यांच्यासाठी पेट्रोलचा साठा आगगाडीनेच पुरवणे शक्य होते. परंतु शत्रूची विमाने सरहद्दीवर घिरट्या घालत होती, आग ओकत होती. अशा परिस्थितीत आगगाडीने पेट्रोल नेणे हे खरोखरीच मोठे दिव्य होते.

या अशा बिकट कामगिरीवर फायरमन चमनलालांची नेमणूक झाली. पेट्रोलचा प्रचंड साठा घेऊन त्यांची मालगाडी अमृतसरहून निघाली. पाकिस्तानी वैमानिकांनी हे नेमके हेरले. गुरुदासपूर स्टेशनमध्ये गाडी शिरली, तोच शत्रूचे एक विमान अचानक आले. विमानातून आगीचा वर्षाव सुरू झाला. भारतीय विमानवेधी तोफांनी शत्रूच्या विमानावर खालून मारा सुरू केला. मारा सुरू होताच शत्रूच्या विमानाने पळ काढला, परंतु जाता जाता त्याने मालगाडी पेटवण्यात यश मिळवलेच. मागच्या वाघिणींनी पेट घेतला. पेट्रोलचा भडका उडाला. आग साधीसुधी नव्हती. साऱ्या आगगाडीने पेट घेतला असता तर शत्रूला तोंड देणे अशक्य झाले असते. भारतीय सैन्याला मोटारी, रणगाडे, विमाने आपापल्या ठिकाणीच थांबवावी लागली असती. देशासाठी तळहातावर शिर घेऊन लढणाऱ्या सैन्याचा पराक्रम वाया गेला असता. पेटलेल्या तीन वाघिणी क्षणाचाही उशीर न लावता बाजूला तोडणे भाग होते.



पेट्रोलने पेट घेतला. त्या ज्वालामुखीत कोण शिरणार? मरणाला आपण-होऊन कोण मिठी मारणार? फायरमन चमनलालजींनी हे पाहिले. त्यांना वाटले की देशसेवेची ही मोठी संधी आहे. देशासाठी काहीतरी करावे असे त्यांना नेहमीच वाटायचे. मागचा पुढचा विचार न करता त्यांनी खाली उडी मारली. धावत जाऊन त्यांनी त्या पेटत्या वाघिणी तोडल्या. जिवाची पर्वा न करता त्यांनी त्या वाघिणी उलट्या दिशेने ढकलल्या. तोच प्रचंड स्फोट झाला. हे धाडस असामान्य होते. आगीकडे धाव घेणाऱ्या चमनलालना परत फिरता आले नाही. त्या प्रचंड आगीने चमनलालना गिळून टाकले. त्यांची त्या आगीत आहुती पडली. मातृभूमीच्या रक्षणासाठी त्यांनी बलिदान केले!

फायरमन चमनलालनी गाजवलेल्या या अद्भुत पराक्रमाचा गौरव करण्यात आला. २६ जानेवारी, १९६६ रोजी प्रजासत्ताक दिनाच्या परम मंगल अशा समारंभात राष्ट्रपतींनी चमनलालना मरणोत्तर अशोकचक्र बहाल केले.

त्या वेळी चमनलालांच्या पत्नीचाही सत्कार करण्यात आला. डोळ्यांत आलेले पाणी मोठ्या प्रयत्नाने तिने आवरले. ती वीरपत्नी त्या दिवशी जमलेल्या अफाट जनसागराला उद्देशून म्हणाली, "माझ्या पतींना वीर-मरण आले. त्यांचे सोने झाले. देशासाठी त्यांनी देह अर्पण केला. मीही आता या चिमण्या पाखरांना मोठे करीन व त्यांनाही अशीच देशसेवा करण्याचा मंत्र देईन."

—अशोक देशपांडे

**अभ्यास :**

१. आगगाडीने पेट्रोल नेणे धोक्याचे का होते?
२. शत्रूच्या विमानास कोणते यश मिळाले?
३. सैन्यास पेट्रोल मिळाले नसते तर काय झाले असते?
४. चमनलालांनी वाघिणी उलट्या का ढकलल्या?
५. अशोकचक्र कोणाला दिले जाते?
६. प्रजासत्ताक दिनाच्या त्या समारंभात चमनलालांच्या मुलाने काय म्हटले असते? त्याचे दोन मिनिटांचे भाषण तयार करा.
७. आपल्या वाक्यांत उपयोग करा :
प्राण पणाला लावणे, आग ओकणे, नेमके हेरणे, मागचा पुढचा विचार न करणे, आहुती देणे, सोने होणे.

**व्याकरण :**

१. 'जवान आघाडीवर' या शब्दसमूहाला वाक्य म्हणता येणार नाही. परंतु या शब्दसमूहापासून अनेक वाक्ये तयार करता येतील. खाली काही वाक्ये दिली आहेत :
(अ) जवान आघाडीवर लढत होते.
(आ) जवान आघाडीवर पोचले पण त्यांच्याकडील पेट्रोल संपले होते.
(इ) जवान आघाडीवर पोचताच शत्रूच्या विमानांनी त्यांच्यावर हल्ला सुरू केला.
२. 'पेट घेतला' व 'देशासाठी लढणाऱ्या' या दोन शब्दसमूहांपासून प्रत्येकी तीन तीन वाक्ये तयार करा.

# १०. सण एक दिन



शिंगे रंगविली   बाशिंगे बांधली
चढविल्या झुली   ऐनेदार
राजा, परधान्या,   रतन, दिवाण.
वजीर, पठाण,   तुस्त मस्त
वाजंत्री वाजता   लेजीम खेळती
मिरवीत नेती   बैलांलागी
दुलदुलतात   कुणाची वशिंडे
काही बांड खोंडे   अवखळ
कुणाच्या शिंगांना   बांधियले गोंडे
हिरवे, तांबडे   शोभीवंत
वाजती गळ्यांत   घुंगरांच्या माळा
सण बैल-पोळा   ऐसा चाले



झुलींच्या खालती   काय नसतील
आसूडांचे वळ   उठलेले ?
आणि फुटतील   उद्याही कडाड
ऐसेच आसूड   पाठीवर !
जरी मिरविती   परि धन्या-ऱ्हाती
वेसणी असती   घट्ट पाहा
जरी झटकली   जराशीही मान
तरी हे वेसण   खेचतील
सण एक दिन !   बाकी वर्षभर
ओझे मरमर   ओढायाचे

—यशवंत

**अभ्यास :**

१. पोळ्याचा सण कधी असतो ? त्या दिवशी बैलांसाठी काय काय करतात ?
२. 'सण एक दिन' असे का म्हटले आहे ?
३. सजवलेल्या बैलांना पाहून कवीच्या मनात कोणते विचार आले ?
४. बैलांचे वर्णन करणारे शब्द शोधून काढा व त्यांचा अर्थ लावा.



# ११. शिलेदाराचे सोबती

फार फार वर्षांपूर्वी चतुरसेन नावाचा धाडसी तरुण एका राजाच्या सैन्यात दाखल झाला. त्याने लढाईत मोठा पराक्रम गाजवला. लढाई संपल्यावर 'गरज सरो वैद्य मरो' या म्हणीप्रमाणे राजाने इतरांबरोबर चतुरसेनाला निरोप दिला; पण हातावर टिकवले फक्त दोन पैसे.

राजा म्हणाला, "इतकी वर्षं तुला जेवण, कपडा फुकट मिळाला. पराक्रम करून नाव कमावण्याची संधीही मिळाली, हे काय थोडं झालं? दोन पैसे शिलकीत पडले. जास्त पैसे खिशात खुळखुळले तर तरुण बिघडतात. आळशी, घरकोंबडे होतात. देशाचं नुकसान होतं. आता तलवार मोडून नांगर धर हातांत."

राजा राजधानीकडे गेला. चतुरसेन संतापाने म्हणाला, "असले लबाड राजे माझ्यासारख्या सरळ माणसांना फसवतात. प्रजेला अन्यायानं छळून आपला खजिना भरतात. याला चांगली अद्दल घडवली पाहिजे. घातपात न करता, डोकं वापरून, चतुराईनं हा मी चतुरसेन आपलं हक्काचं ते मिळवीन; हीच माझी प्रतिज्ञा! दणकट मनगटात जोर आहे. मूठ वळायचाच अवकाश

आहे. पण मूठ वळते पाच बोटांची, एकजुटीनं. पाच जणांचं पथक झालं तर चुटकीसरशी काम फत्ते होईल."

शिलेदार चतुरसेन राजधानीकडे निघाला. मनात एकच विचार—धाडसी, अद्‌भुत शक्ती असलेले साथीदार मिळाले पाहिजेत. कसे मिळणार, केव्हा मिळणार? शिलेदार जंगल तुडवत चालले. एका ठिकाणी एक धिप्पाड माणूस गवत उपटावे तशी मोठमोठी सरळसोट उंच झाडे मुळापासून उपटून आजूबाजूला फेकत होता.



शिलेदार म्हणाले, "रामराम, रिकामपणाचा खेळ चालला आहे वाटतं? दुसरा उद्योग नसेल तर येतोस माझ्याबरोबर मुशाफरीला? मी चतुरसेन शिलेदार. तुझं काय नाव?"

तो अवाढव्य पुरुष म्हणाला, "मी भीमाप्पा. येतो ना मालक. मी मोकळाच आहे. पण म्हातारीला महिनाभराचं जळण हवं. चार काटक्या झोपडीत टाकून येतो झटपट. इथंच थांबा."

भीमाप्पाने पाच सोटांची रास करून सहावे झाड दोरीप्रमाणे वाकवून मोळी बांधून खांद्यावर टाकली. दाणदाण पावले टाकत भीमाप्पा गेला आणि पाच मिनिटांत परतसुद्‌धा आला. शिलेदार म्हणाले, "पहिला सोबती, पहिला शिपाईगडी मिळाला. भीमाप्पा, एक, दोन. चलो राजधानी."



पुढे जाता जाता त्यांना एक ओसाड प्रदेश लागला. ऊन रणरणत होते. आभाळात कापसाच्या बोंडाएवढाही ढग नव्हता. मैलाच्या टापूत एक झुडूप की चिटपाखरूही दिसत नव्हते. तरी पण

एका खडकावर बसून एक फाकडे निशाणबहाद्दूर बंदूकवाले डावा डोळा मिटून बंदुकीचा नेम धरून बसले होते.

चतुरसेनाने विचारले, "काय राव, शिकार येणार की निसटली ? हा भीमाप्पा, मी चतुरसेन. कोणतं सावज टिपता आपण ? मला तर कुठं काहीच दिसत नाही."

तोंड न फिरवता बंदूकवाले म्हणाले "नावाचे चतुर खरे, पण दूरदृष्टी नाही आपल्याला. मी टिप्पोजी. गम्मत म्हणून हत्यार चालवतो. थांबा, तुम्हांला नाही दिसायचं. तीन मैलांवरच्या माडाच्या शेंड्यावर एक उपद्रवी, विषारी माशी बसली आहे. तिचा डावा डोळा फोडून तिला एका डोळ्यानं आंधळी करायची आहे. ठो ! आता ही गरगर फिरत दमून आपोआप मरेल. आम्ही विनाकारण माणसं मारत नाही. दुष्टांना जरब बसवतो."

चतुरसेन म्हणाला, "बस ! असा जबरदस्त गडी हवा पथकात ! टिप्पोजी, होता या शिलेदाराचे सोबती ? लुच्च्या राजाची खोड मोडू या. येता ?"

खांद्यावर बंदूक ठेवीत टिप्पोजी उभे राहून पुढे चालायलाच लागले. डोळा उघडून ते म्हणाले, "नेम बरोबर मारायचा एवढाच माझा नेम. चला. एक, दोन, तीन."

निघाले त्रिकूट. थोडे दूर गेल्यावर जे दिसले ते विलक्षणच ! रस्त्याच्या कडेला एक माणूस एका पायावर उभा होता. दुसरा पाय सांध्यातून उखडून त्याने बाजूला ठेवला होता. गडगडल्यासारखे खो खो हसत भीमाप्पा म्हणाले, "शर्यत मारल्यावर पाय दुखले म्हणून एक पाय काढून आराम करता वाटतं ? का तुमचं नावच तैमूरलंग ! जरा किरकोळ काडीपैलवान दिसता."

पाय उचलून हातात घेत तैमूर म्हणाला, "तुमचं डोकं चाललं खरं. माझं नाव तैमूर. पळण्याच्या शर्यतीत कोणी भागच घेऊ देत नाही मला. दोन्ही पायांनी धावलो तर विलक्षण गती येते. म्हणून मी नेहमी एक पाय काढूनच ठेवतो."

चतुरसेन म्हणाला, "मी शिलेदार चतुरसेन. तैमूर, होतोस माझा सोबती ? शर्यतीत दोन्ही पायांनी धावण्याची संधी देईन तुला. येतोस माझ्या पथकात, मुशाफरीवर ?"

सुद्य पाय बंदुकीप्रमाणे खांद्यावर धरून तैमूर टिप्पोजीजवळ उभा राहिला.

"फेरफटका करायला मी एका पायावर तयार आहे. पृथ्वीला फेऱ्या मारू चला."

चौकडी राजधानीच्या मार्गाला लागली. आता चौथा सोबती हवा. असे शिलेदाराच्या मनात येते तोच समोरून एक उंच, लांबटांग्या माणूस येताना दिसला. डोक्यावर तिरकस, वाकडी टोपी बसवून तो तिरळे पाहात चालला होता. तो आपल्याच नादात गात गात आला तर अंगावर आदळेल असे वाटून चतुरसेन चिडून म्हणाला, "अहो गवई, समोर पाहून चला. तिरकी टोपी शोभते तुम्हांला. विचित्रच दिसता!"

तो उंच माणूस म्हणाला, "विचित्रच आहे मी. नाव तिरकी टोपीवाले. नाकासमोर पाहून चालतो सरळ पण टोपी सरळ केली तर काय होईल माहीत आहे? हवा एकदम थंड होईल. पाणी गोठून बर्फ आणि दूध गोठून आइस्क्रीम!"

टिप्पोजी म्हणाले, "मजेदार माणूस दिसतोस. गाणं ऐकूनच शत्रू घाबरेल. येतोस आमच्याबरोबर राजाचा समाचार घ्यायला? आपण या शिलेदाराचे चार सोबती."



टोपीवाले म्हणाले, "हो जी! शिलेदार, तुम्ही नुसता हुकूम् करा की टोपी सरळ केलीच समजा."

मजल दर मजल करीत पथक राजधानीत पोहोचले. राजकन्या लक्ष्मीचे स्वयंवर होते. राजाने जाहीर केलेला पण विचित्र होता. राजकन्या पळण्यात पटाईत होती. तिला शर्यतीत जिंकले तर राजकन्येची माळ गळ्यात पडेल. पण हरेल तर एकदम फाशी! देशोदेशींचे राजपुत्र आले;पण कुणाची हिम्मत चालली नाही. विषाची परीक्षा कोण घेतो?

सोबत्यांना घेऊन शिलेदार राजासमोर जाऊन म्हणाले,

“राजा, असल्या फुसक्या अटीसाठी मी कशाला धावू ? माझ्या वतीनं माझा शिपाई धावला तर चालेल तुला ?”

खुनशी राजा म्हणाला, “फार चांगलं. जिंकलं तर राजकन्या तुझी. पण शिपाई हरला तर तुमची सगळ्यांची मुंडकी छाटीन! येथून दहा मैलांवर असलेल्या झऱ्याचं पाणी घागरीत भरून जो कोणी प्रथम येईल त्यानं जिंकली शर्यत. समजला पण ?”

चतुरसेन म्हणाला, “शुभस्य शीघ्रम्. होऊन जाऊ द्या आत्ताच. तैमूर, दोन्ही पाय तय्यार!”

कमरेवर घागर घेऊन राजकन्या उभी राहिली. ‘एक...दोन....पळा’ असे म्हणताच खांद्यावर घागर घेतलेला तैमूर दिसेनासा झाला. झऱ्यावर पाणी भरून पाच मैल परत आल्यावर तैमूरला गुंगी आल्यासारखे वाटले. झोप लागू नये म्हणून काहीतरी खुपणारे डोक्याखाली असावे, यासाठी एक दगड उशाखाली घेऊन तैमूर आडवा झाला. तो गाढ झोपी गेला. घागर भरून राजकन्या अर्ध्या वाटेवर परत आली, तेव्हा निजलेला तैमूर तिला दिसला. आनंदाने हलकेच त्याची घागर ओतून राजकन्येने मोठ्या उमेदीने वेशीकडे धूम ठोकली.



इकडे वेशीच्या बुरुजावर ठाण मांडून, बंदूक डोळ्याला लावून टिप्पोजी बसलाच होता. पळत येणारी राजकन्या त्याला दिसली आणि पाच मैलांवरचा झोपी गेलेला तैमूरही त्याला दिसला. त्याला जागे केले नाही तर सगळ्यांची डोकी उडतील म्हणून टिप्पोजीने नेम धरून उशाखालच्या दगडावर अचूक गोळी मारल्याबरोबर तो खाडकन् जागा झाला. शेजारी रिकामी घागर दिसताच त्याला सारे उमजले. पुन्हा झऱ्यावर पाणी भरून तैमूर वेशीत परत पोचला, त्या वेळी राजकन्या दोन मैल मागे होती. धापा टाकत पळत येत होती. पाय सोडवून खांद्यावर टाकत तैमूर म्हणाला, "छान मालक, पाय मोकळे करून आलो."

चतुरसेनाला राजाने ओळखले होते. मनात दुसरी युक्ती योजून तो म्हणाला, "शाबास! उद्या लग्नाचा बार उडवू. आता तुम्ही सगळे निवांत जागी विश्रांती घ्या."

शिलेदार आणि सोबती सेवकांबरोबर एका खोलीत गेले. आता खाण्या-पिण्याची चंगळ होती. पण खोली कसली ती! खोलीची जमीन, भिंती, छत ही लोखंडी पत्र्याची होती.

दार बंद करून खोलीखालच्या चुलाणात नोकरांनी रसरशीत निखाऱ्यांची भट्टीच पेटवली. तासाभरात मंडळी होरपळून जातील हा राजाचा बेत!

भीमाप्पा म्हणाले, "काय उकडतं हो!"

चतुरसेनाने राजाचा कावा ओळखला. त्याने ताबडतोब हुकूम दिला, "तुर्की तिरकस टोपीवाले, टोपी सरळ." टोपी सरळ होताच एकदम खोली थंडगार. टोपीवाले गाऊ लागताच घाबरून राजाने दार उघडले. सारे सुरक्षित पाहून तोच गार झाला.

पण लबाड तो! शेवटची युक्ती म्हणून तो म्हणाला, "चतुरसेना, आता ओळखलं मी. चुकल्याची भरपाई करतो. हवं तितकं सोनं देतो. पण राज-कन्येवरचा हक्क सोड." शिलेदार म्हणाले, "कबूल, राजकन्येच्या मर्जीबाहेर नाही मी. माझा शिपाई खांद्यावर वाहून नेईल तेवढं पोतंभर सोनं मला पुरे! आठ दिवसांनी येईल माझा शिपाई."

खांद्यावर एक भलेमोठे पोते टाकून आलेला भीमाप्पा पाहताच राजा मनात चरकला. सोळा माणसे उचलून आणीत ते सारे सोने भीमाप्पा एका हाताने पोत्यात टाकी. खजिना रिता झाला तरी पोते अर्धेच भरले. सक्तीने लोकांचे सोने जमा करून हजार गाडे आणले. लोक संतापून गोळा झाले. "नको असला जुलमी राजा. आम्हीच राज्य चालवतो." एकच गोंधळ झाला.

भीमाप्पा म्हणाला, "कंटाळलो. उशीर झाला परतायला. आता एक गाडी बैलांसकट पोत्यात कोंबतो आणि गाठ मारतो."

पोते पाठीवर टाकून भीमाप्पा निघाला. इतर सोबती निघाले. चतुरसेन मागे वळून म्हणाला, "लोकहो, राजाला अद्दल घडली. त्याला सांभाळून घेऊन तुम्हीच कारभार चालवा. तुमचं सोनं तुम्हांला परत करतो. आम्ही चाललो नांगर धरायला. नसेल राजकन्येची बरोबर येण्याची इच्छा तर—"

पण राजकन्या कमरेवर घागर घेऊन हळूहळू पावले टाकत केव्हाच निमूटपणे चतुरसेनाजवळ येऊन उभी राहिली होती.

—श्री. बा. रानडे

अभ्यास :

१. चतुरसेन राजावर का रागावला?

२. चतुरसेनाने कोणता निश्चय केला?

३. चतुरसेनाने कोणते चार सोबती मिळवले? त्यांनी त्याला कोणकोणती मदत केली? त्यामुळे काय झाले?

४. चतुरसेनाने लोकांना काय सांगितले?

५. साथीदार, मुशाफरी, जरब या शब्दांचे अर्थ समजावून घ्या.

# १२. कावळा



अगदी बाळपणीच काऊचिऊची ओळख आपल्याला होते. भाताचा मऊ घास भरवताना आई त्यांचीच नावे घेते—'हा चिऊचा, हा काऊचा.' बोलता यायला लागले की पहिली गोष्ट सांगता येते ती, 'एक होती चिमणी, एक होता कावळा!' त्याचे शेणाचे घर धो धो पावसात वाहून गेल्यावर तो चिमणीच्या बंद दारावर धडका देतो. असा हा कावळा मोठा वस्ताद पक्षी आहे. माणसाच्या जवळपास राहूनही तो अंतर राखून असतो. इतर पाखरे बेसावध आढळतील, पण कावळा अहोरात्र सावध बुद्धीने वागत असतो.

पोट भरणे ही कावळ्याच्या दृष्टीने अगदी सोपी गोष्ट आहे. त्याला काहीही चालते. उकिरड्यावर पडलेला उंदीर तो खुशीने उचलून घेऊन जातो. घाईगडबडीने चाललेल्या कोळणीच्या पाटीतला मासा तो वरच्यावर पळवतो. संधी साधून उघड्या खिडकीतून स्वयंपाकघरात शिरून तो भाकरीपोळी लांबवतो. ही चोरी आहे याची त्याला बिलकूल खंत नसते.

गावात राहून कावळा जसा अन्न मिळवतो, तसा बाहेर रानात भटकूनही मिळवतो. मिरच्यांच्या पिकात शिरून पिकल्या मिरच्या खा, मक्याच्या कणसांवर ताव मार, गव्हाच्या लोंब्या ओरबाड. ज्वारीची कणसे ओरबाड असे त्याचे चालूच असते. शिजवलेले अन्नच पाहिजे असे चोचले नाहीत; शिळेपाके खाऊनही तो तृप्त असतो.

परवा संध्याकाळी पाऊस पडला. आमच्या घराभोवती काळे रान बरेच आहे. सूर्य मावळायला आला होता. बाहेर कावळ्यांची कर्कश कावकाव चालली होती. मी बाहेर येऊन पाहिले तर शे-दोनशे कावळे जमलेले

दिसत होते. त्या काळ्या झालेल्या रानातून किडे बाहेर पडले होते. कावळ्यांची चंगळ झाली होती.

कावळे दोन प्रकारचे दिसतात. काही कावळ्यांची मान राखी रंगाची असते. सगळे अंग काळे कुळकुळीत आणि मान तेवढी राखी. पण काही कावळ्यांची मान आणि अंग यांत काही फरक नसतो. हे दोन्हीही कावळेच. तरीसुद्धा त्यांच्यात थोडा फरक आहे. जे गावाच्या आसपास आढळतात, ते आपल्या जातभाईंपेक्षा अंगाने लहान असतात. त्यांची चोचही लहान असते. आमच्या वाड्यात, मधल्या चौकातच, लिंबाचे झाड होते. त्यावर काही कावळे वस्ती करून होते. बेंदूर-दिवाळीच्या निमित्ताने घरात कडबोळी तळली जात. मी कडबोळी घेऊन सोप्यात येई आणि एकेक कडबोळे अधांतरी उडवी; तर बेरकी कावळे ती बरोबर झेलत.

दुसऱ्या प्रकारचा कावळा काळा कुळकुळीत व रानात राहणारा. ह्याची चोच मोठी असते. आवाजसुद्धा जास्त कणखर आणि घोगरा असतो. हा रानकावळा गावात दिसत नाही असे नाही. पण गावातल्या कावळ्यासारखा तो घराभोवती खरकटे धुंडत बसत नाही. रात्री थव्याथव्याने झाडावरती बसत नाही. हे रानकावळे लांब रानात, जंगलात एकटेदुकटे आढळतात.

जंगलात शिकारीला गेल्यावर ह्या कावळ्यांचा फार उपयोग होतो. वाघासारखे जनावर जाळीतून बाहेर पडलेले पाहिले की हा तीक्ष्ण नजरेचा कावळा आरडाओरडा करतो. जनावरांची हालचाल शिकाऱ्याला कळते. गरीबगुरीब जनावरांना, पाखरांना शिकाऱ्यापासून धोका आहे हे ध्यानात येताच हेच कावळे, शिकाऱ्याऐवजी जनावरा-पाखरांना सावध करतात.

हरेल नावाची हिरव्या रंगाची कबुतरे असतात. झाडावर हरेल आले रे आले, की बंदुका घेऊन हौशी शिकारी रस्त्यावर हिंडतात. हरेलांचा रंग राघूसारखा असल्यामुळे हिरव्या पानांतून ते लवकर दिसत नाहीत. बारीक नजरेने बघावे लागते. त्यामुळे शिकारी पोरे, वडाखाली उभी राहून, माना वर करकरून बघतात. कावळ्यांच्या हे लक्षात येताच ते आरडाओरडा करतात. नुसते



ओरडूनच थांबत नाहीत. जिथे जिथे हरेल बसलेला असेल तिथे तिथे त्याच्याजवळ ते जाऊन ओरडतात. जणू त्याला ते सांगतात, "अरे ऊठ, पळ, तुला मारायला माणसे आली आहेत."

कावळ्याच्या या शहाणपणाचा अनुभव मलाही एकदा आला.

कारवारच्या जंगलात शिकारीला गेलो असताना सकाळी उठून मी एका तळ्याच्या काठी गुपचूप जाऊन बसलो. झाडाच्या आड, अगदी दगडासारखा बसल्यामुळे मी कुणाला दिसत नव्हतो.

काही वेळाने लांब मानेचे दोन ढोक पक्षी उडत उडत आले आणि अगदी माझ्यासमोर पाण्यात आडव्या पडलेल्या वठलेल्या झाडावर ते बसले. त्यांनी

मला मुळीच पाहिले नाही. मग काही वेळाने पंचरंगी होले आले आणि अगदी माझ्या पुढ्यातच तळ्याच्या काठाकाठाने फिरू लागले. मोठे जनावर येईल म्हणून मी वाट पाहात बसलो होतो. ह्या सर्व पाखरांना ज्या अर्थी माझा पत्ता नाही त्या अर्थी मी अगदी छान दडलो आहे अशी माझी खात्री झाली. मग काही बदके पोहत पोहत माझ्यासमोर आली. शेपट्या सारख्या नाचवणाऱ्या दोन चिमण्या आल्या.

जरा वेळाने दोन कावळे आले आणि तळ्याभोवती असलेल्या उंच उंच वेळूवर बसले. त्यांच्या-माझ्यात फार अंतर होते.

नंतर सावट घेत घेत दोन रानकोंबडे पाण्यावर आले. खरे तर मला कोंबडे मारायचे नव्हते. पण बघावे सहज नेम धरू देतात का, म्हणून मी बंदूक नुसती उचलली. आणि काय सांगावे, वेळूवर बसलेले ते दोन कावळे मोठ्यांदा ओरडले, 'काव! काव! काव!' त्यासरशी इतका वेळ माझ्यासमोर पिसे उकरत बसलेले ते दोक 'कोक् कोक्' करत पळाले. बदके आवाज करत निघून गेली. शेपटी नाचवणाऱ्या चिमण्याही धूम पळाल्या आणि ते दोन कोंबडेही गेले.

कावळे पुन्हा साळासारखे आपल्या जागी बसून राहिले. पुढे मी दोन तास बसलो. ज्या ज्या वेळी कोंबडा पाण्यावर येई त्या त्या वेळी नेमके कावळे ओरडून इशारा देत आणि कोंबडा पसार होई.

शेवटी मी उठून मुक्कामावर यायला निघालो, तेव्हा हे दोन्हीही कावळे माझ्या डोक्यावर उडत मला तिथपर्यंत पोचवीत आले आणि दिसेनासा झालो तेव्हा आपल्या वाटेने निघून गेले.

'कावळा म्हणे मी काळा, पांढराशुभ्र तो बगळा 'अशी एक कविता मी लहानपणी शिकलो होतो. त्या कवितेत सांगितले होते—बगळ्याकडे बघून कावळ्याला आपल्या काळ्या रंगाचे फार वाईट वाटले. लगेच त्याने पैशाचा साबू आणला. अंग गोरे व्हावे म्हणून ते साबूने धू धू धुतले, घास घास घासले, पण तो पांढरा तर झाला नाहीच, मात्र रक्तबंबाळ होऊन बिचारा मरून गेला.

ह्या कवीला कावळा माहीतच नव्हता असे आज मला वाटते. कावळा हा अती हुशार! साबू लावून अंग पांढरे होईल असा मूर्खपणाचा विचार त्याच्या डोक्यात येणारच नाही. आणि आपण काळे आहोत याचे त्याला वाईट वाटणेही शक्य नाही.

—व्यंकटेश माडगूळकर

अभ्यास :

१. दोन प्रकारचे कावळे कोणते? ते कुठे कुठे राहतात?
२. कावळ्याचा कोणता विशेष शहाणपणा या पाठात सांगितला आहे?
३. लेखक शिकारीला गेले असताना त्यांना कोणता अनुभव आला?
४. लेखकाला लहानपणच्या कोणत्या गोष्टीची आठवण झाली? ती खरी नसावी असे त्याला का वाटते?
५. हरेल, ढोक, होले, रानकोंबडे, दोन्ही प्रकारचे कावळे यांची चित्रे मिळवा. ती चिकटबुकात चिकटवा. प्रत्येक चित्राखाली त्या पक्ष्याबद्दल एकेक वाक्य लिहा.

व्याकरण :

१. चतुरसेन, भीमाप्पा, टिप्पोजी ही माणसांची नावे आहेत.
   कावळा, चिमणी, घार ही पक्ष्यांची नावे आहेत.
   ससा, वाघ, हरीण ही पशूंची नावे आहेत.
   निंब, बाभूळ, वड ही झाडांची नावे आहेत.
   ज्वारी, गहू, मका ही धान्यांची नावे आहेत.
   रान, गाव, तळे ही ठिकाणांची नावे आहेत.
   वर दिलेली ही सर्व वस्तूंची नावे आहेत. या वस्तू आपल्याला दिसतात. 'कावळा' या पाठात धोका, विचार, आरडाओरडा, शहाणपण, लहानपण हे शब्द आले आहेत. यांनाही व्याकरणात वस्तूंचीच नावे म्हणतात. त्या वस्तू दिसत मात्र नाहीत. वस्तूच्या किंवा पदार्थाच्या नावाला व्याकरणात 'नाम' म्हणतात.
२. 'कावळा' या पाठातील 'नंतर सावट घेत घेत....कोंबडे गेले' हा मजकूर वाचा. त्यातील नामे ओळखा.

# १३. दयाळू चक्रधर

सुमारे सातशे-साडेसातशे वर्षांपूर्वीची गोष्ट. एका जंगलात एका विशाल वृक्षाखाली एक सत्पुरुष ध्यानस्थ बसला होता. तो अत्यंत देखणा होता. त्याची मुद्रा प्रसन्न होती. त्याच्या चेहऱ्यावर तेज होते.

दूरवर कुत्र्यांच्या भुंकण्याचा आवाज त्याला ऐकू आला. त्या तेजस्वी पुरुषाने डोळे उघडून पाहिले. पाहतो तो काय, एक गोंडस, गोजिरा ससा कावराबावरा होऊन वाट फुटेल तिकडे जीव घेऊन धावत होता. त्याच्यामागे कुत्री धावत होती. पारध्यांच्या आरोळीने जंगल दुमदुमून गेले होते.

बिचारा ससा सैरावैरा पळत होता. कुठे जावे, हेच त्याला सुचत नव्हते. तेवढ्यात त्याला त्या प्रचंड वृक्षाच्या छायेत बसलेला तो तेजस्वी पुरुष दिसला. किती हायसे वाटले त्याला! भेदरलेल्या सशाच्या जिवात जीव आला. सारे बळ एकवटून तो त्या सत्पुरुषाच्या दिशेने धावत सुटला आणि डोळ्याचे पाते लवते न लवते तोच त्याच्या मांडीखाली जाऊन बसला. त्या सत्पुरुषानेही त्याच्याकडे प्रेमभराने पाहिले व त्याला मायेने कुरवाळले. इतक्यात—

सशाचा पाठलाग करणारी काही शिकारी कुत्री तेथे आली. पळून पळून किती दमली होती ती! त्या कुत्र्यांच्या पाठोपाठ काही पारधीही आले. हात जोडून त्यांनी त्या सत्पुरुषाला विनंती केली, "महाराज, हा ससा धरण्याची पैज लागली आहे. तुम्ही त्याला सोडून दिलं तर आमच्यावर फार उपकार होतील."

तेव्हा तो सत्पुरुष म्हणाला, "अरे, या गरीब प्राण्यानं तुमचा कोणता अपराध केला आहे? त्याला का धरता?"

"त्याला आम्ही ठार करणार आहोत."

"अरेरे! या गरीब बिचाऱ्या प्राण्याला ठार मारणार तुम्ही? का? कशाकरता? या गरीब जिवाची उगीच हत्या का करता?"

यावर पारध्यांनी कोणतेच उत्तर दिले नाही. ते निमूटपणे उभे राहिले. तेव्हा सत्पुरुषाने पुन्हा विचारले, "तुमचा कुणी असाच छळ केला तर तुम्हांला

आवडेल का ते ? बोला, या प्रश्नाचं आधी उत्तर द्या आणि मग खुशाल घेऊन जा हा ससा."

पारधी खाली मान घालून उभे राहिले. त्यांना त्या प्रश्नाचे उत्तर देता आले नाही. तेव्हा तो सत्पुरुष पुढे म्हणाला, "आणि हे पाहा, हा ससा तर मला शरण आला आहे. जो आपल्याला शरण येतो, त्याचं आपण रक्षण करायला नको काय ?"

हे ऐकल्यावर त्या पारध्यांना आपल्या कृत्याबद्दल फार पश्चात्ताप वाटू लागला.



सत्पुरुष म्हणाला, "बाबांनो, या गरीब बिचाऱ्या सशानं तुमचा कोणताही अपराध केलेला नाही. हा आपल्या सवंगड्यांबरोबर या रानावनात राहतो. गवत-पाला खातो. ओढ्याचं निर्मळ पाणी पितो आणि हसत-बागडत असतो. कुणालातरी यानं त्रास दिला आहे का ? सांगा पाहू ? मग कशाकरता याचा जीव घ्यायचा ?"

पारध्यांनी त्या सत्पुरुषाची क्षमा मागितली. यापुढे आपण प्राण्यांची हत्या करणार नाही अशी प्रतिज्ञाही त्यांनी केली.

पारधी निघून गेल्यावर त्या सत्पुरुषाने आपल्या मांडीखाली दडलेल्या सशाला वात्सल्याने कुरवाळले. तेव्हा तो टुणकन् उडी मारून जंगलात दिसेनासा झाला.

हा दयाळू सत्पुरुष म्हणजेच चक्रधरस्वामी होत. भारतात अनेक धर्मपंथ आहेत. महानुभाव पंथ हाही त्यांपैकीच एक पंथ होय. चक्रधरस्वामींनी या पंथाची स्थापना केली.

चक्रधरस्वामींचा जन्म गुजरातेत झाला. काही वर्षांनंतर ते महाराष्ट्रात आले. महाराष्ट्रात येऊन त्यांनी आपल्या पंथाची शिकवण लोकांना दिली. सर्वांशी प्रेमाने वागावे, परमेश्वराची भक्ती करावी, कोणत्याही प्राण्याची हत्या करू नये असे कितीतरी चांगले विचार त्यांनी लोकांना सांगितले. लोक सन्मार्गाला लागावे, त्यांचे भले व्हावे म्हणून ते सतत झटले. त्यासाठीच त्यांनी आपले सारे आयुष्य वेचले.

**अभ्यास :**

१. सशाने कोणाचा आश्रय घेतला ?

२. चक्रधरांनी सशाबद्दल पारध्यांना काय काय सांगितले ? चक्रधरांच्या सांगण्याचा पारध्यांवर कोणता परिणाम झाला ?

३. चक्रधरांनी कोणता धर्मपंथ स्थापन केला ? त्यांनी समाजाला कोणती शिकवण दिली ?

४. जिवात जीव येणे, पाठलाग करणे, प्रतिज्ञा घेणे या शब्दसमूहांचा अर्थ समजावून घ्या.

५. चक्रधरस्वामींचे वर्णन करणारी दहा वाक्ये लिहा.

६. चक्रधर व पारधी यांच्यामधील संवाद वर्गात करून दाखवा.

**व्याकरण :**

१. खालील वाक्यांत रिकाम्या जागी योग्य नामे लिहा :

(अ) बिचारा ........ सैरावैरा पळत होता.

(आ) सारे ........ एकवटून तो त्या सत्पुरुषाच्या दिशेने धावत सुटला.

(इ) त्या कुत्र्यांच्या पाठोपाठ काही ........ आले.

(ई) तुमचा कुणी असाच ........ केला तर तुम्हांला आवडेल का ते ?

(उ) लोकांचे ........ व्हावे म्हणून ते सतत झटले.

२. या पाठातील शेवटचा परिच्छेद वाचा व त्यातील नामे ओळखा.



# १४. कृष्णाची वनक्रीडा

वनी खेळती बाळ ते बल्लवांचे
तुरे खोविती मस्तकी पल्लवांचे
फुलांचे गळा घालिती दिव्य हार
स्वनाथासवे ते करीती विहार ॥ १ ॥
स्व-कौशल्य ज्या गुंज-माळांत नाना
गळा घालिती ते करीती तनाना
शिरी बांधिती मोर-पत्रे विचित्रे
शरीरावरी रेखिती दिव्य चित्रे ॥ २ ॥
मुखे वासुनी, लोचन- भ्रूतद्यते
उभारूनिया वाकुल्या मर्कद्यते
अहो, दाविती शब्द तैसे करीती
असे खेळती बाळ निःशंक रीती ॥ ३ ॥

वनी देखता मेघनीलास मोर
प्रमोदे करी नृत्यलीला समोर
तयासारिखे नाचती तोक सारे
खुणावूनि अन्योन्य की, तो कसा रे ॥ ४ ॥
वदे कृष्ण गोपाळबाळा जनाते
'बसूनी करू ये स्थळी भोजनातें
वनी वत्स सोडा चरायासि, पाणी
तया पाजुनीया', म्हणे चक्रपाणि ॥ ५ ॥
निजमुख कवणाही आड-दृष्टी असेना
रचुनि बसवि ऐसी भोवती बालसेना
हरिवदन पहाया सर्व दृष्टी भुकेल्या
म्हणुनि बहुत पंक्ती मंडलाकार केल्या ॥ ६ ॥
असे कर्णिका अंबुजामाजि जेवी
मुलांमध्यभागी बसे कृष्ण तेवी
मुखी ग्रास सप्रेम घालूनि हाती
दहीभात दे, सर्व लीला पहाती ॥ ७ ॥

—वामनपंडित

बल्लव – गवळी, स्वनाथासवे – आपल्या पुढाऱ्याबरोबर, श्रीकृष्णाबरोबर, तनाना – ताना, गाणे, भ्रूतट – भुवई, मेघनील – मेघासारखा निळा कृष्ण, तोक – मुलगे, अन्योन्य – एकमेकांस, चक्रपाणि – ज्याच्या हातात चक्र आहे तो कृष्ण, कर्णिक – कमळाचा मध्यभाग, अंबुज – कमळ.

अभ्यास :

१. गवळ्याची मुले कुणाबरोबर खेळत होती? ती मुले कोणकोणते खेळ खेळत होती?
२. गोपाळांनी कोणता पोशाख केला होता?
३. गोपाळांच्या मुलांना श्रीकृष्णाने काय करायला सांगितले? ते जेवायला गोलाकार का बसले?

# १५. निसर्गरम्य माथेरान

पुणे ते मुंबई रेल्वेने प्रवास करत असताना नेरळ स्टेशन लागते. स्टेशनच्या पलीकडे उभ्या असलेल्या निळ्या रंगाच्या छोट्या आगगाड्या दिसतात. या गाड्या पुण्याच्या पेशवे पार्कमधील फुलराणीची आठवण करून देतात. लहान मुले त्यांच्याकडे कुतूहलाने टकमका पाहात राहतात. थोरांनाही त्याचे आकर्षण वाटते. माथेरानला घेऊन जाणाऱ्या या गाड्या पाहताच माथेरानचे सृष्टिसौंदर्य डोळ्यांसमोर उभे राहते. माथेरानला जाणाऱ्या या गाड्यांतून प्रवास करताना मोठी मौज येते. मनाला मोह पाडणारी दृश्ये आलटून पालटून दिसू लागतात.

अवघे पाचसहा डबे मंद गतीने ओढत ओढत शिखर गाठणाऱ्या या लहानशा गाडीची शक्ती ती कितीशी असणार ? ताशी अवघ्या सात-आठ किलोमीटर वेगाने ती प्रचंड चढण चढत असते. 'जुम्मापट्टी' हे अडीच-तीन किलोमीटर अंतरावर असलेले स्टेशन गाठायला तिला तब्बल अर्धा तास लागतो. गाडी थांबताच करवंदे आणि आटकी यांचे द्रोण घेऊन ठाकूरवाडीतील ठाकरांची पोरे आणि पोरी गाडीच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत धावपळ करत असतात. आइस्क्रीमवाल्यांची गडबड तर काही विचारूच नका. एका रुपयाला एक कोन. हवा खायला आलेली धनिक मंडळी पैशाची कशाला पर्वा करतील ? सामान्य माणसाला मात्र दहा पैशांचा करवंदांचा द्रोण तितकाच गोड वाटतो.

नेरळपासूनच नागमोडी वाटावळणांची व चढउतारांची सुरुवात होते. या मार्गाने जाताना एखाद्या पठारावरून आपण चकरा मारीत आहोत असा भास होतो. त्यामुळे मन थोडे गोंधळून जाते. माथेरानच्या भव्यतेची किंचितही कल्पना येत नाही. वॉटरपाईप स्टेशनपासून मात्र ही स्थिती झपाट्याने बदलत जाते. इथून दूरवर दिसणारे लहानसे नेरळ गाव अतिशय मनोहर दिसते. आपण कितीतरी उंचावर आलो याची कल्पना येऊ लागते. माथेरानच्या वाऱ्याच्या आल्हादकारक झुळकी हळूहळू इथूनच मनाला उल्हसित करू लागतात. डाव्या बाजूला पाहावे तर नेरळ–माथेरान पायवाटेची नागमोडी वळणे दृष्टीस



पडतात. मागे दृष्टी टाकावी तो चिमुकली रेल्वेलाइन खाली खाली उतरत गेलेली आढळते. वर दृष्टी गेली की माथेरानच्या शिरावरील लहानमोठे वृक्ष आणि पुढे आलेले पॉइंट दिसतात आणि समोर दिसणाऱ्या रम्य निसर्गाकडे आपण आपोआपच आकर्षिले जातो. आजूबाजूच्या झाडांवरून बागडणारी माकडे पाहून तर क्षणोक्षणी करमणूक होते. त्यांचे मिष्किल हावभाव कौतुकाने पाहात असतानाच माथेरानचे छोटेसे स्टेशन केव्हा येते हे कळतही नाही.

थंड हवेच्या ठिकाणी ठराविक हंगामातच लोकांची रहदारी असते. तेव्हाच व्यापार होत असतो. या ठिकाणी माणसांनी ओढावयाची रिक्षा आणि घोडे यांखेरीज कोणतेही अन्य वाहन आणण्यास परवानगी नाही. वाहनासाठी इथे भरमसाट पैसे मोजावे लागतात आणि तेही साहजिकच आहे. जिकडे तिकडे उंच उंच वृक्षांची आणि झाडाझुडपांची घनदाट झाडी. त्यांतून काढलेले

पूर्वापार रस्ते अरुंद. शिवाय त्यांची वळणे व चढउतार अतिशय अवघड आहेत. त्यामुळे रिक्षा ओढणारा एक माणूस असला तरी त्याच्या मदतीस दोन धट्टीकट्टी माणसे पाहिजेत, असा येथे नियम आहे. त्यांच्या अंगांतून ठिपकणाऱ्या घामाच्या धारा पाहिल्या की, ते घेत असलेले पैसे, सर्वसाधारण माणसाला डोईजड वाटले तरी, त्यांच्या कष्टाच्या मानाने योग्यच वाटतात. माथेरानची निसर्गसुंदर शिखरे पाहण्यासाठी लोकांची रीघ लागते. काही लोक ती पाहण्यासाठी पायीच चालत जातात, तर काही रिक्षा करून जातात. अलेक्झांडर पॉइंट हा येथील जवळचा पॉइंट. या पॉइंटवरून लुइझा पॉइंट, गारबट पॉइंट व खोपोली, कर्जत येथपर्यंतचा विस्तृत परिसर दृष्टीस पडतो. तिथून पायच निघत नाही. मनाला वेड लावणारी अशी कितीतरी शिखरे माथेरानला आहेत.

पॅनोरमा पॉइंट हा माथेरानमधील सर्वांत उंच व सुंदर पॉइंट. तो पाहण्यासाठी जरा दूर जावे लागते. पण तिथे पोचताच दृष्टीसमोर निसर्गाचे जे भव्य आणि नयनमनोहर चित्र उभे राहते, ते पाहून डोळ्यांचे पारणे फिटते. डावीकडे हाजीमलंग, प्रबळगड इत्यादी डोंगर जमिनीवर कसे जागोजागी ठेवल्याप्रमाणे दिसतात. नैऋत्येस मुंबई बंदर, घारापुरी, कल्याणवाडी यांची शोभा पाहायला



मिळते. मुंबईच्या विस्तीर्ण सागराचा इथून दिसणारा देखावा तर केवळ अपूर्व आहे. ईशान्येकडे पेबकिल्ला, मलंगड, नवरानवरीची टेकडी या ठिकाणांचे सौंदर्य मनाला मोहून टाकते. समोरच्या खोऱ्यात चिमुकले नेरळ गाव दिसते. तेथून दिसणारा उल्हास नदीचा प्रवाह तर अतिशय चित्तवेधक वाटतो.

माथेरानची निसर्गशोभा केवळ अवर्णनीय आहे. या असीम निसर्गसौंदर्याचा आनंद लुटण्यासाठी माथेरानलाच गेले पाहिजे.

— द. धों. रेगे

**अभ्यास :**

१. माथेरानला जाणाऱ्या आगगाडीने प्रवास करताना कोणती मौज वाटते ?

२. माथेरानमधील अलेक्झांडर पॉइंटवरून कोणती शोभा दिसते ?

३. माथेरानमधील पॅनोरमा पॉइंट मनाला का मोहवतो ?

**व्याकरण :**

१. (अ) नेरळ स्टेशनवर निळ्या रंगाची छोटी आगगाडी दिसते ती लहान मुलांना फार आवडते.

(आ) माझे नाव सुरेश. मी रोज शाळेत वेळेवर जातो.

(इ) अरे सुधाकर, तू आज संध्याकाळी आमच्याकडे येशील का ?

पहिल्या वाक्यातील 'ती' म्हणजे आगगाडी. दुसऱ्या वाक्यातील 'मी' म्हणजे सुरेश, तिसऱ्या वाक्यातील 'तू' म्हणजे सुधाकर. ती, मी, तू हे शब्द आगगाडी, सुरेश व सुधाकर या नामांऐवजी वापरले आहेत. या व यांसारख्या शब्दांना सर्वनामे म्हणतात.

२. खालील वाक्यांत दुसऱ्यांदा आलेल्या नामांऐवजी योग्य सर्वनामे लिहा :

(अ) गायीजवळ तिचे वासरू बांधलेले होते. वासरू फार छान होते.

(आ) माथेरानला चढण फार असल्यामुळे रिक्षावाले फार दमतात. म्हणून रिक्षावाल्यांना दिलेले पैसे रिक्षावाल्यांच्या कष्टाच्या मानाने योग्यच वाटतात.

(इ) माथेरानला जाणारी आगगाडी लहान असते. ताशी अवघ्या सातआठ किलोमीटर वेगाने आगगाडी प्रचंड चढण चढत असते.



# १६. राष्ट्रपिता महात्मा गांधी

गांधीजींचे चित्र तुम्ही नेहमी पाहता. गांधीजी मोठे धिप्पाड नव्हते. उंचीही फारशी नव्हती. अंग सडसडीत. चेहरामोहरा साधाच. पोशाख काय, तर एक पंचा. पण त्यांनी आपल्या राष्ट्रावरच नव्हे तर साऱ्या जगावर केवढी छाप पाडली!

अशी कोणती मोहिनी गांधीजींच्या अंगी होती?

गांधीजी शूर होते. आणि शूर माणूस कुणाला आवडत नाही? गांधीजींनी

आपला सत्याग्रहाचा प्रयोग प्रथम आफ्रिकेत केला. त्या ठिकाणी हिंदी लोकांना गुलामांसारखे वागवत. गोरे लोक त्यांना पायदळी तुडवत. गांधीजी एक खटला चालवायला म्हणून तेथे गेले. त्यांनी हिंदी लोकांची दैन्यावस्था पाहिली आणि अन्यायाविरुद्ध सर्वांना संघटित करण्यासाठी कंबर कसली. ते भारतात आले. आपल्या आफ्रिकेतल्या हिंदी बांधवांसाठी त्यांनी देशभर हिंडून मदत गोळा केली आणि ते परत आफ्रिकेला जायला निघाले.

आफ्रिकेतले गोरे राज्यकर्ते गांधीजींच्या विरुद्ध होते. गांधीजी पुन्हा आफ्रिकेत आले तर त्यांचा निकाल लावू असे ते बडबडत ! कित्येक मित्रांनीही गांधीजींना सावधगिरीचा इशारा दिला आणि आफ्रिकेला त्यांनी येऊ नये अशी परोपरीने विनंती केली. पण अन्यायाशी सामना द्यायचा गांधीजींचा निर्णय कायम होता. बंदरात उतरल्यापासून गोरे लोक त्यांना मोठमोठ्याने ओरडून सांगत होते, 'गांधी, परत जा !' आणि त्यांनी सारखी दगडफेक चालवली होती. गांधीजींचे सारे अंग रक्ताने माखून निघाले. पण ते शांतपणे पुढे जात होते. एका पोलीस अधिकाऱ्याच्याच पत्नीने त्यांना झटकन घरात घेतले म्हणून बरे, नाहीतर काय झाले असते याची कल्पना करवत नाही.

असे अनेक प्रकार गांधीजींच्या जीवनात आले. कित्येकदा स्वतःच्या माणसांशीसुद्धा त्यांना लढावे लागले. त्यांना जी गोष्ट पटली ती पार पाडण्यासाठी ते प्राणपणाने झटत. मात्र प्रतिपक्षाचा द्वेष ते कधी करत नसत. आफ्रिकेत असताना एका पठाणाने त्यांच्या डोक्यात सोटा हाणला ! गांधीजी बेशुद्ध झाले. पण शुद्धीवर येताच, त्या पठाणाला शिक्षा न करता सोडून द्यावे असे त्यांनी सांगितले.त्यांच्या शूरपणाला अशी करुणेची झालर होती; त्यामुळेच तो फार खुलून दिसे.

रंजल्यागांजलेल्यांचे ते कैवारी होते. सर्व माणसांना ते सारखे मानत. त्यांच्या पहिल्या कारावासाच्या वेळी जेलरने भंगीकाम करायला राजबंद्यांपैकी दोन माणसे गांधीजींजवळ मागितली. राजबंद्यांत असे काम करणारे कुणी नव्हते. गांधीजींनी ते काम स्वतः पत्करले. अस्पृश्यांबद्दल त्यांना फार प्रेम. अस्पृश्यांची

एक छोटी मुलगी दत्तक कन्या म्हणून त्यांनी वाढवली. तिचा बालहट्ट पुरविण्यासाठी तिच्या तोंडातला उष्टा घाससुद्धा त्यांनी खाल्ला. जे मागासलेले आहेत, दलित आहेत त्यांची सेवा हीच ईश्वराची पूजा असे गांधीजी मानत.

पण गरिबांची सेवा करायची नुसती इच्छा करून भागत नाही. त्यासाठी सर्व जीवनाला शिस्त लावून घ्यावी लागते. ती गांधीजींनी फार मोठ्या प्रमाणात लावून घेतली. वस्तूंची उधळमाधळ करायची नाही, उगाच मिळते आहे म्हणून घ्यायचे नाही यावर त्यांचा फार कटाक्ष असे. एकदा त्यांची मधाची बाटली नेहमीपेक्षा लवकर संपली. त्यांच्या शिष्या मीराबाई यांनी नवी विकत आणली. हे कळताच गांधीजी रागावले. ठरीव मुदतीच्या आत जर एखादा जिन्नस संपला तर ते तसेच भागवायचे. एक हातरुमाल अमूक दिवस वापरायचा असे ते ठरवत. त्याच्या अगोदर जर तो हरवला तर तेवढा काळ हातरुमाला-वाचून ते काढत ! वस्तूइतकीच वेळेचीही दक्षता ते घेत. प्रार्थना अमूक वाजता सुरू व्हायची, मुलाखतीची वेळ अमुक, लेख अमूक दिवशी पोस्टात टाकायचा हे सारे ठरवलेले असे. त्यात चालढकल, गबाळेपणा ते होऊ देत नसत.

आपला देश गरीब आहे. येथे लक्षावधी माणसे अर्धनग्न स्थितीत काळ कंठतात. या माणसांच्या उन्नतीसाठी झटायचे तर त्यांच्यासारखेच झाले पाहिजे. आपले बांधव अर्ध्यामुर्ध्या कपड्यावर राहतात, मग आपण नखशिखांत कपड्यांनी शरीर मढवून टाकणे गैर नाही का ? हा गांधीजींनी विचार केला. ते पंचा नेसून राहू लागले. इंग्लंडच्या बादशहाच्या भेटीला जातानासुद्धा त्यांनी हा आपला वेश बदलला नाही.

पण पंचा नेसून राहणारा हा महात्मा रुक्ष किंवा फार गंभीर होता असे मात्र समजू नका. स्त्रिया, मुले, सामान्य माणसे यांच्या मेळाव्यात हास्यविनोद करत ते रमून जात. एकदा एका सोल्जरने त्यांना शिव्यांची लाखोली वाहिलेल्या कवितांचे कागद टाचणी लावून त्यांच्या कामाच्या कागदपत्रात ठेवून दिले. थोड्या वेळाने येऊन तो विचारू लागला, "काय, कवितेचं सार आलं का ध्यानात ?"

गांधीजींनी हसून त्याला आपल्याजवळची डबी दाखवली आणि म्हटले, "सारं यात सुरक्षित आहे." कागदाची टाचणी त्यांनी आपल्या डबीत ठेवून दिली होती! सोल्जर पाय आपटीत चडफडत निघून गेला.

असे होते गांधीजी! जितके शूर, तितके दयाळू, व्रतस्थ, तसेच विनोदी. सर्व गुण एकमेकांत कसे छान मिसळलेले! इंद्रधनुष्याचे सात रंग कसे मिळून जातात. तसे! म्हणून तर या कृश व साध्या चेहऱ्यामोहऱ्याच्या महात्म्याने साऱ्या जगाला मोहून टाकले. इंद्रधनुष्य दिसू लागले की कसे आपण आश्चर्याने आणि आनंदाने बघतो, तसेच गांधीजींकडे आपले डोळे लागतात.

—गोपीनाथ तळवलकर

**अभ्यास :**

१. गांधीजी आफ्रिकेत कशासाठी गेले होते?

२. आफ्रिकेत त्यांना कोणती महत्त्वाची कामगिरी करावी लागली?

३. पठाणाबद्दलच्या प्रसंगातून गांधीजींचा कोणता गुण दिसून येतो?

४. छाप पाडणे, प्राणपणाने झटणे, कंबर कसणे, शिव्यांची लाखोली वाहणे यांचे अर्थ समजावून घ्या.

५. गांधीजींचे कोणकोणते गुण या पाठात वर्णिले आहेत?

**व्याकरण :**

१. पाठातील तिसरा परिच्छेद वाचा. त्यातील सर्वनामे ओळखा. ती कोणत्या नामांच्याऐवजी आली आहेत ते पाहा आणि खाली दिल्याप्रमाणे त्यांच्या जोड्या जुळवून लिहा :

**नाम** **त्यापेवजी आलेले सर्वनाम**

२. खालील रिकाम्या जागी योग्य ती सर्वनामे लिहा :

(अ) ............मोठे विनोदी होते.

(आ) ............पोहायला केव्हा जाणार आहेस?

(इ) शशी रडत आली होती, कारण ............पुस्तक हरवले होते.

(ई) तुम्ही बरे होईतोवर ............रोज ............औषध आणून द्यायला येत जाईन.

# १७. वादळ

माणकू आपल्या होडीत चढायच्या विचारात होता. अथांग सागर अगदी शांत होता. किनाऱ्यावरील पुळणीबरोबर सदा भांडणारा दर्या अगदी रुसून बसला होता. आपल्या हद्दीची रेघ मारून त्या रेषेच्या आत तो फुरंगटून बसला होता. किनाऱ्यावरील झाडेझुडपे, कातळी टेकड्या, माडाच्या झावळ्या, त्याला वेडावत होत्या. पण सागर अगदी थंड होता. त्याच्या मनात काय दडले होते कोणास ठाऊक !

होडीत साचलेले पाणी नरुट्या भरभरून माणकूने बाहेर फेकून दिले. गेला पुरा महिना त्याला मासळी गावली नव्हती. निदान आज तरी मासळी सापडेल असे त्याला वाटत होते. गेले कित्येक दिवस तो रोज दर्यावर जात असे. पण त्याच्या जाळ्याला मासा लागला नव्हता.

दर्याकडे पाहून त्याने कपाळाकडे हात नेला. तो दर्याला म्हणाला, "आज तरी यश देणार की नाही ? तूच जर रुसलास तर आम्ही लेकरांनी जायचं कुठं ? पोटाला खायचं काय ? फार नको, पण निदान पोटापुरतं तरी देणार की नाही ? होडीभर मासळी दिलीस तर भलंच होईल. तुला एक नारळ देईन."

मान वळवून त्याने आपल्या झोपडीकडे पाहिले. त्याची रत्ना किनाऱ्याकडे धावत येत होती. झोपडीचे दार तसेच उघडे होते. रत्ना अतिशय अस्वस्थ होती. सागर जितका शांत, तितकी रत्ना अशांत होती. धावत येऊन एका हाताने तिने होडी धरली व दुसऱ्या हाताने माणकूचा हात धरला. ती म्हणाली, "बाबा, नका जाऊ आज दर्यावर."

"अग खुळे, असं करून कसं चालणार ? आपण दर्याची लेकरं. आपण जायचं नाही दर्यावर तर कोण जाणार ?"

रत्नाला माणकूचे सांगणे रुचले नाही. ती पुन्हा म्हणाली, "आज मला कसंसंच होतंय. तुमच्यासाठी मी पेज करायला टाकलीय. ती झाली म्हणजे घ्या. मग पाहिजे तर जा दर्यावर."

माणकू कौतुकाने रत्नाचे सांगणे ऐकत होता. त्याने रत्नाच्या दोन्ही गालां-वरून हात फिरवले; तिला उचलून घेतले. आणि तो तिच्या समजावणीसाठी म्हणाला, " तू पेज तयार कर. मी येतोच एवढ्यात. अग मी काय लांब जाणार नाही. निस्त्याक करायला म्हावरं घेऊन येतो. गेला महिना नुसती पेज आणि भात खाऊन कंटाळा आलाय बघ. तू चल झोपडीकडं. " माणकूने रत्नाला खाली ठेवले व होडीवरची काठी उचलून वाळूत रोवून त्याने जोराने रेटली. होडीला गती मिळाली. होडी दर्यात चालली.

झोपडीकडे जायला रत्नाचा पाय उचलेना. कालवलेल्या मनाने दर्यातल्या होडीकडे पाहात ती तशीच उभी होती. माणकूने फक्त एकदा मागे पाहिले. माणकूची होडी लहान लहान होऊ लागली. शेवटी तर ती नुसती ठिपक्या-एवढी दिसायला लागली.

माणकू दर्यावर गेला की रत्ना नेहमीच खळबळून जात असे. पण आज तिला विशेष काहीतरी वाटत असावे. तिला काय होत होते हे मात्र तिला समजत नव्हते. ओल्या वाळूवर पाय रेटून ती आपल्या झोपडीकडे निघाली. तिच्या पायांखाली इवले इवले शंख-शिंपले रेटले जात होते. तिची पावले झोपडीच्या दिशेला ठसे उमटवत चालली होती.



रत्ना झोपडीत आली. चुलीखालचा जाळ केव्हाच कमी झाला होता. झोपडीत धूर भरायला लागला होता. रत्ना चुलीजवळ गेली. तिने चुलीला फुंकर घालायला सुरुवात केली. एवढ्यात झोपडीच्या दारातून भराभरा वारा आला. झोपडीभर आडदांड घुसलेल्या वाऱ्याने छप्पर आभाळात उडवले.

रत्ना झोपडीबाहेर आली. तिने सभोवताली पाहिले. बाहेरचे जग बदलून गेले होते. झाडे जमिनीवर कोसळत होती. वारा बेभान झाला होता. कुठले तरी दूरवरचे ढग त्याने आभाळात जमवले होते. सागराने आपली शांतता सोडली होती. किनाऱ्यावरच्या पुळणीवर तो धडका घ्यायला धावत होता. हे अकांडतांडव पाहायला विजली आली. कडकडा करून तिने त्यात भरच घातली. पाऊस धाडधाड कोसळायला लागला.

रत्नाने छप्पर उडालेल्या झोपडीकडे एकदा पाहिले. झोपडीचा उरलासुरला भाग वाऱ्याला थोपवत होता. बेफाम झालेल्या समुद्राकडे रत्नाची नजर वळली. तिला एक भयंकर प्रकार दिसला. दर्यात दूरवर एक भला मोठा पाण्याचा डोंगर तयार झाला होता. तो वेगाने किनाऱ्याकडे येत होता.

रत्नाने त्या डोंगर-लाटेकडे पाहिले आणि "बाबा! बाबा!" म्हणून किंकाळी फोडली....आणि....

सागर अफाट उफाळत होता; पण रत्ना स्तब्ध होती. दर्या अमर्याद नाचत होता; पण रत्ना निश्चल होती. समुद्र सारखा गर्जत होता; पण अजाण रत्ना अबोल झाली होती.

गावदेवीच्या देवळात एक भली मोठी घंटा होती. ती ठाण् ठाण् ठाण् आवाज करू लागली. गावातले लोक सागरकिनाऱ्याकडे निघाले. धोक्याच्या घंटेचा आवाज त्यांनी ओळखला. घंटेचा आवाज वातावरण फोडून ज्यांच्या कानांवर पडला ती ती माणसे संकटाला तोंड द्यायला सागराकडे निघाली.

ठाण् ठाण् ठाण्...घंटा घणघणत होती. गावातील माणसे किनाऱ्याकडे धावत होती. रत्ना मात्र आपल्या मोडक्या झोपडीशेजारी निश्चल उभी होती. एकटक पाहात होती. तासभर ती तशीच उभी होती.

वादळ संपले. सगळीकडे शांत शांत झाले. निश्चल रत्ना आता मात्र चालू लागली. तिची नजर आता सभोवार भिरभिरू लागली. झोपडीत, वाडीत, किनाऱ्यावर रत्ना भटकत होती.

इतक्यात दूर दूर किनाऱ्यावरून कुणाची तरी अस्पष्ट हाक तिला ऐकू आली, "रत्ना !" ती हाक ऐकताच रत्ना हरखली. तोच तो आवाज !

रत्ना सुसाट धावत सुटली. क्षणातच ती त्या व्यक्तीजवळ पोहोचली आणि "बाबा ! बाबा !" करीत ती माणकूच्या कुशीत दडली.

—ना. गो. शुक्ल



## अभ्यास :

१. दर्याकडे पाहून माणकूने कपाळाकडे हात का नेला ?

२. 'बाबा, नका जाऊ आज दर्यावर', असे रत्ना का म्हणाली ?

३. माणकू दर्यावर गेला की रत्ना नेहमीच का खळबळून जात असे ?

४. बेभान वाऱ्याने किनाऱ्यावर, सागरावर कसे थैमान मांडले याचे तीनचार वाक्यांत वर्णन करा.

५. वादळाचा रत्नावर कोणता परिणाम झाला ?

६. या कथेचा शेवट काय झाला ?

७. खालील शब्दांचे अर्थ समजावून घ्या :
पुळण, कातळ, फुरंगटून बसणे, झावळ्या, पेज, म्हावरे, बेभान, उधाण, निश्चल.

## व्याकरण :

१. (अ) गावदेवीच्या देवळात एक मोठी घंटा होती.
(आ) रत्ना मात्र आपल्या मोडक्या झोपडीशेजारी निश्चल उभी होती.
(इ) कुणाची तरी अस्पष्ट हाक रत्नाला ऐकू आली.

वरील वाक्यांत घंटा, झोपडी, हाक या नामांसंबंधी विशेष माहिती मिळते. 'एक मोठी', 'आपल्या मोडक्या', 'अस्पष्ट' या शब्दांमुळे त्या नामांबद्दल विशेष माहिती मिळते. नामासंबंधी विशेष माहिती देणाऱ्या शब्दाला विशेषण म्हणतात.

२. खाली दिलेल्या वाक्यांतील विशेषणे ओळखा :
(अ) आम्ही नव्या घरात राहायला जाणार आहोत.
(आ) फुलपाखरांच्या पिवळ्या अंगावर लाल, निळे ठिपके खुलून दिसत होते.
(इ) एका ठिकाणी एक धिप्पाड माणूस, गवत उपटावे तसे मोठमोठे सरळसोट उंच वृक्ष मुळापासून उपटून आजूबाजूला फेकत होता.



## १८. अरे, अरे कळसा

—अरे, अरे कळसा,
हसून नको पाहू !
पायरीचा मी दगड
तुझाच की भाऊ !

—मी तर बडा कळस !
माझा किरीट झळझळीत;
पायरीचा तू दगड
पडलास धूळ गिळीत.

—अरे, अरे कळसा,
जरा बघ – जरा तरी,
पायरीचा मी दगड
तुझा भाऊ – गरीब जरी.

—मी उंच कळस !
चढणार आकाशी !
पायरीचा तू दगड
पडणार तळाशी.

—अरे, अरे कळसा,
नको गाल फुगवून बसू;
पायरीचा मी दगड
तरी भाऊ भाऊ असू.

—डौलदार मी कळस !
माझा मुकुट कसा छान !
पायरीचा तू दगड,
तुझा पैजारांचा मान.

—अरे, अरे कळसा,
नको झिडकारू मला;
भाऊ ना मी तुझा,
माझा दादा तू भला.

—कुठे मी कळस !
मला ठेंगणे आभाळ !
पायरीचा तू दगड,
आपली पायरी सांभाळ !

कळसाचा दगड
गर्वाने चढला;
पायरीचा दगड
मान घालून बसला.

इतक्यात आला सज्जन
देवदर्शन करीत
पायरीवर बसला
'राम राम' करीत.

तितक्यात आला कावळा
पंख फडकावीत
जाऊन बसला कळसावर
'काव काव' करीत !

—रा. अ. काळेले

अभ्यास :

१. पायरीचा दगड कळसाला कोणती विनंती करीत होता ?
२. कळसाने दगडाची विनंती का नाकारली ? ती नाकारताना त्याने काय उत्तर दिले ?
३. कळसाला कोणता गर्व झाला होता ? त्याचा गर्व दूर करणारी कोणती गोष्ट घडली ?
४. कळस आणि पायरीचा दगड यांचा संवाद लिहा.

# १९. चाक—एक वरदान



एका टेकडीच्या उतारावर काही ओंडके पडले होते. बाजूला मुले खेळत होती. खेळता खेळता एक मुलगा ओंडक्यावर चढला. त्याच्या पायाने ओंडका फिरला आणि उतारावरून गडगडत जाऊ लागला. गंमत वाटून मुलाने दुसरा ओंडका सोडून दिला. तोही ओंडका गडगडत गेला. मग इतर मुलेही ओंडके लोटू लागली. एकामागून एक ओंडके खाली जाऊ लागले. टाळ्या पिटीत ती ओरडू लागली.

ओंडक्याचे चाक झाले. माझा जन्म झाला.

या खेळातून माझा जन्म झाला. पण जन्मताच मी कामाला लागलो. देवळे बांधण्यास शिळा वाहू लागलो. एकेक शिळा हत्तीएवढी असे. आडव्या ओंडक्यावर शिळा चढवून सरकवीत नेत. शिळा पुढे सरकली की मागचा ओंडका मोकळा होई. तो पुढे आणून शिळा आणखी पुढे सरकवीत. असे करीत करीत वाटेल तेवढी मोठी शिळा दूरवर नेता येत असे.

हळू हळू ओंडक्यांचा ओबडधोबड आकार मी टाकून दिला. मी सुबक वाटोळा झालो. लोक मला चाक म्हणू लागले. माझ्यामुळे गाडीची कल्पना सुचली. बैलगाडी तयार झाली. ती भरभर धावू लागली. लोक लांबलांबच्या यात्रा करू लागले. धान्याची वाहतूक होऊ लागली. कुणी माझ्यावर कविता केल्या. सूर्यालासुद्‌धा माझे नाव दिले. लोक म्हणू लागले, सूर्य हा चाक आहे. त्याला बारा आरे आहेत. 'फिरत नाही ते चाक कसले?' ही म्हण तुम्हांला ठाऊक आहे ना! अशा काही म्हणी माझ्यावर तयार झाल्या.

आधी होतो मी लाकडाचा. नंतर झालो मी लोखंडाचा. मी कणखर झालो. सायकली, मोटारी, आगगाड्या माझ्यामुळे धावू लागल्या. लोकांचे दूरदूरचे प्रवास थोड्या वेळात होऊ लागले. मुलांनो, तुम्ही सायकलीवर बसून सहलीला जाता. मोटारीत बसून लांबलांबचा प्रवास करता. आगगाडीत बसून तुम्ही मामाकडे जाता. मी नसतो तर ही सायकल, ही मोटार, ही आगगाडी कशी बरे धावली असती?

आगबोटीही माझ्यामुळे चालतात. विमाने माझ्यामुळे उडतात. माझ्यामुळे परदेशाचे प्रवासदेखील थोड्या वेळात होतात. जेव्हा पाणी गावात शिरते व माणसे महापुरात अडकून असतात अशा वेळी माझ्यामुळे उडणारे विमानच त्यांना अन्न पोचवते.

पण मी फक्त प्रवासासाठीच मदत करतो असे नाही, माझ्यामुळे आडातील पाणी भरभर शेंदता येते. कुंभार गाडगी-मडकी कशी तयार करतो हे तुम्ही कधी पाहिले आहे काय? मला जागच्या जागी तो फिरवतो, माझ्यावर मधोमध ओली माती ठेवतो व तिला हवा तसा आकार देतो.



घड्याळजीकडे कधी उघडलेले घड्याळ पाहिले आहे काय? तिथे आम्ही हातांत हात घालून जागच्या जागी फिरतो, एकमेकांना मदत करतो. घाई नाही की कुरकूर नाही. टिक, टिक, टिक. शाळेला उशीर होऊ नये म्हणून घड्याळ तुम्हांला अचूक वेळ सांगते.

एंजिनमध्येदेखील मी जागच्या जागी फिरतो. पण तेव्हा मी शक्ती पुरवत असतो. माझ्या शक्तीवर दुसरी यंत्रे, काम करतात. एक यंत्र लाकडे कापते. दुसरे यंत्र खेळणी तयार करते. तिसरे यंत्र भांडी बनवते. चौथे पंप हालवून शेतांत पाणी देते. पाचवे वीज तयार करून घरोघरी प्रकाश देते. आणखी किती यंत्रांबद्दल सांगू?

घरोघरी मी आहेच. तुमच्या शिवणाचे यंत्र मीच चालवतो. त्यावर तुमची आई तुमचे कपडे शिवते. पूर्वी ती हाताने कपडे शिवत असे. एक कपडा शिवायला तेव्हा कितीतरी दिवस लागत. शिवून शिवून तुमच्या आईची बोटेही दुखू लागत. पाठ मोडून येई. आता एक कपडा शिवायला तिला तासही लागत नाही.

माझे आकार तरी किती? घड्याळावर तर मी नखाएवढाच असतो. गिरणी-तील यंत्रात माझा आकार खूप मोठा असतो. मी घड्याळात कागदासारखा चपटा होतो, तर रस्त्यावर अगडबंब बनून खडी दाबतो. कधी भिरभिरे होऊन मुलांबरोबर धावतो, तर कधी चरखा बनून सूत कातती.

मी नसेन तर तुम्हांला लांब लांब जाता येणार नाही. तुमची यंत्रे चालणार

नाहीत. ओझे वाहून न्यायला तुमची खूपच शक्ती खर्ची पडेल. फार काय तुम्हांला जगणेच कठीण होऊन बसेल. पण मी आहे ना मानवाची सेवा करायला! मला गाडीला लावोत किंवा घड्याळात ठेवोत, मी फिरत राहणार. काम करीत राहणार.

—दि. वा. मोकाशी

**अभ्यास :**

१. चाकाचा शोध कशामुळे लागला?

२. इमारतीसाठी लागणारे खूप मोठे दगड पूर्वी कसे वाहून नेत असत? आता ते कसे वाहून नेतात?

३. चाक जागच्याजागी देखील काम करते, हे दाखवण्यासाठी कोणतीही दोन उदाहरणे द्या.

४. 'चाकाचा शोध लागला नसता तर....' यावर दहा ओळी लिहा.

५. प्रवासाच्या कोणत्याही तीन साधनांची चित्रे काढा.

**व्याकरण :**

१. खालील वाक्यांत रिकाम्या जागी योग्य विशेषणे लिहा :

(अ) ओंडक्याचा ..........आकार मी टाकून दिला.

(आ) मडके घडवण्यासाठी ..........माती लागते.

(इ) माथेरानला जाणाऱ्या या गाडीतून प्रवास करताना..........मौज वाटते.

(ई) लोकांचे दूरदूरचे प्रवास..........वेळात होऊ लागले.

(उ) शाळेला उशीर होऊ नये म्हणून घड्याळ तुम्हांला..........वेळ सांगते.

२. खाली काही नामे व विशेषणे दिली आहेत. त्यांच्या योग्य जोड्या जुळवा :

| विशेषणे | नामे |
|---|---|
| लांबलांबच्या | आकाश |
| लक्षावधी | पुस्तक |
| निरभ्र | यात्रा |
| एक | रस्ते |
| अरुंद | माणसे |
| सोनेरी | |

# २०. तू तर माझ्याही पुढं गेलीस !

त्या वेळी आम्ही वाईस राहात होतो. तेथेही टिळकांची व्याख्याने, 'उपदेश, संभाषणे व लेखन इत्यादी गोष्टी चालूच होत्या. एक दिवस एक बाई आमच्या घरी आली. ख्रिस्ती लोकांत आता मी एक वर्षावर दिवस काढले असल्याने त्या समाजातील पुष्कळ रीतीरिवाज माझ्या ध्यानात आले होते. बाई आल्याबरोबर मी उठून तिचे स्वागत केले. शेकहँड करण्यासाठी हात पुढे केला, खुर्ची पुढे सारली. पण बाईने आपला हात पुढे केला नाही, की ती घरात आली नाही. तिने विचारले, "साहेब आहेत ?"



मी म्हणाले, "ते बाहेर गेले आहेत."

ती म्हणाली, "त्यांनी मला कामाला बोलावलं आहे."

मी म्हणाले, "आमच्या इथं काही काम नाही."

मला मनात मोठे आश्चर्य वाटले. ही बाई काय काम करणार ? घरातील कामाला दोन माणसे आम्ही नगरहूनच आणली होती.

बाई गेली.

मला फार आश्चर्य वाटले. बाई काय विचित्र आहे ! घरात आली नाही, शेकहँड केला नाही. तिच्या अंगावर दागिने किती ! सरी, पाटल्या, पुतळ्यांची माळ, नाका-कानांतले, नेसू लुगडे पंधरा-वीस रुपयांचे ! ही बाई आमच्या घरी काम तरी काय करणार ? असेल काही यांचे लिहिण्याचे काम. मी मनाची समजूत करून घेतली.

संध्याकाळी टिळक आल्यावर विचारू लागले, "भंगीण आली होती का ? मुलांचे मळीन कपडे धुवायला तिला मी उद्यापासून बोलावलं आहे."

"ती भंगीण का होती ?" मी विचारले.

"हो, का ?"

"मी तिला बसायला खुर्ची दिली अन् शेकहँडकरता हात पुढं केला. पण ती आपली गप्पच. गोल साडी नेसली असल्यामुळं ती कोण ख्रिस्तीच बाई असावी असं मला वाटलं. बरं, हातात मोहोरेची अंगठी पाहून बाई हिंदू वाटे म्हणून असा घोटाळा झाला."

"तुला असं का वाटतं, की फक्त तुझेच लोक तेवढे स्वच्छ राहतात ?"

दुसऱ्या दिवसापासून ती कामाला येऊ लागली. अंगण झाडणे, मुलांचे मळलेले कपडे धुऊन आणणे वगैरे कामेही ती करू लागली. मी एक दिवस तिला विचारले, "काय ग, तू इतकी स्वच्छ अन नीटनेटकी दिसतेस, तसं तुझं घर आहे का स्वच्छ ?"

"बाई, अशाच चलता का माझ्या घरी ? नाही तर तुम्ही म्हणाल मी आधी झाडून-सारवून मग तुम्हांला दाखवते. चला अशाच्या अशाच."

मी तिला घेऊन तिच्या घरी गेले.

ती वस्ती कोणत्या लोकांची होती ह्याची मी चौकशी केली नाही. पण तेथील घरे-दारे व रस्ता अगदी स्वच्छ होता. तिच्या घराचे दरवाजे मोठे होते. आतमध्ये ताट-वाट्या, पाणी पिण्याची भांडी अगदी चकचकीत होती. घरात केर-पोतेरे केलेले, भांड्यांची बुडे घेतलेली, अंगणात सडा टाकलेला, दारी तुळशीवृंदावन हे सारे पाहून मी आश्चर्याने थक्कच झाले. स्वच्छता व टापटीप ही जातीपेक्षा व्यक्तीवर अवलंबून आहेत असे जे माझे मत होते, ते आता अधिक दृढ झाले.

ह्या क्षेत्राच्या ठिकाणी कोयना-कृष्णेचा संगम होतो, तसे माझे झाले. मी त्या भंगिणीच्या गळ्यात मिठी मारून विचारले, "का ग, तुम्ही आमच्या हातचं का खात नाही ?"

ती म्हणाली, "बाई, आमची जात नावं ठेवते."

मी म्हणाले, "आता तू माझं घर पाहिलं आहेस. मलाही पाहिलं आहेस. आता हरकत नाही."

ती म्हणाली, "बाई, माझ्या हातचं खाल तुम्ही ?"

मी म्हणाले, "हो, काय झालं ?"

म्हटल्याप्रमाणे त्या भंगिणीने फराळाचे करून आणले. टिळक महाबळेश्वरला डॉ. ह्यूमला भेटायला गेले होते. मी ते फराळाचे घेतले. घरातील चाकर-नोकर कुरकूर करू लागले. मी त्यांना सांगितले, "तुम्हांला नको असेल तर माझा काही आग्रह नाही. मी न् माझी मुलं खाऊ." आणि दत्तू, हौशी व मी आम्ही तिघांनी ते फराळाचे खाल्ले. आपल्या हातचे ह्या बाईने इतक्या प्रेमाने खाल्ले म्हणून भंगिणीलाही फार आनंद झाला.

टिळक दुसऱ्या दिवशी परत आले. त्यांना हे कळले तेव्हा ते म्हणाले, "तू तर माझ्याही पुढं गेलीस!"

—लक्ष्मीबाई टिळक

अभ्यास :

१. 'तू तर माझ्याही पुढं गेलीस!' असे टिळक कोणास म्हणाले ? का ? २. भंगिणीची व लक्ष्मीबाईंची पहिली भेट झाली तेव्हा लक्ष्मीबाईंना आश्चर्य का वाटले ? ३. भंगिणीच्या घरी गेल्यावर लक्ष्मीबाईंचे कोणते मत दृढ झाले ? का ? ४. 'स्वच्छता व टापटीप ही जातीपेक्षा व्यक्तीवर अवलंबून आहेत.' यातील विचार नीट समजावून द्या. ५. स्वागत करणे, प्रेमाचा भोपळा फुटणे, आश्चर्याने थक्क होणे या वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा.

व्याकरण :

१. (अ) एक दिवस एक बाई आमच्या घरी आली. (आ) काशीबाई म्हणाल्या, "हो, मी तुमच्या हातचं खाईन." (इ) शेतकरी शेत नांगरतो.

वरील वाक्यांत 'आली' या शब्दावरून त्या बाईने काय केले, हे कळते. 'खाईन' या शब्दावरून काशीबाई पुढे काय करणार आहेत, ते कळते. 'नांगरतो' या शब्दावरून शेतकरी कोणती क्रिया करतो, हे कळते. 'आली', 'खाईन', 'नांगरतो' अशा शब्दांना क्रियापदे म्हणतात.

२. खालील वाक्यांतील क्रियापदे ओळखा :

(अ) तिघांनी ते फराळाचे खाल्ले. (आ) मी उद्या मुंबईस जाईन. (इ) माझा मित्र छान छान चित्रे काढतो. (ई) वादळ शांत झाले.

# २१. मी तुझी मुलगीच

ती एक जलपरी होती. मानवी शरीर घेऊन ती फिरायला जायची. ठरलेल्या वेळी घरी परत गेली तरच ती पुन्हा परी व्हायची. तिला आज परतायला उशीर झाला होता. ती पाण्यात शिरली, पण तिच्या मानवी शरीरात बदल झाला नाही. तिला मिळालेले पाय कायम राहिले. आता तिला निदान महिनाभर तरी याच स्थितीत राहावे लागणार होते.

तिला कळून आले, आपण आता जलपरी नाही. आपल्या मैत्रिणी आपल्याला सोडून गेल्या. आता आपण एकट्या–अगदी एकट्या राहिलो. पुढच्या अमावास्येपर्यंत एकटीने रहायचे !

तिने किनाऱ्याकडे पाहिले. वाळूवर गाय व तिचे वासरू उभे होते. अतिशय व्याकुळ नजरेने ती दोघे तिच्याकडे पाहात होती. त्यांच्याकडे पाहताच जलवंतीला एकदम उमाळा आला. ती धावतच पाण्यातून बाहेर आली.

जलवंतीने गाईच्या गळ्याला मिठी मारली. वासराच्या आणि गाईच्या डोळ्यांत आपल्याविषयी किती आपुलकीची, प्रेमाची भावना आहे असे तिला



समजून आले. आपण अगदी एकट्या आहोत ही भावना चुकीची आहे असे तिला आता वाटू लागले.

जलपऱ्या एकमेकींबरोबर खेळत, नाचत; पण त्यांच्यापैकी एखादी कोठे राहिली, गळाली तरी त्यांना कधीच खेद वाटत नसे. पूर्वी तिच्या मनावर कोणताच परिणाम होत नसे; पण आज ती माणसाप्रमाणे रडू लागली.

थोड्या वेळाने तिने आपली आसवे पुसली. वासराला थोपटले व ती किनाऱ्याकिनाऱ्याने चालू लागली. तिच्याबरोबर ती गाय व ते वासरूही चालू लागले.

काही वेळाने किनाऱ्याच्या बाजूला तिला एक झोपडी दिसली. अगदी लहान झोपडी होती ती. झोपडीचे दार उघडून ती हळूच आत गेली.

झोपडीमध्ये एक म्हातारी अंथरुणावर तळमळत होती. तिला ताप आला होता, उठवतसुद्धा नव्हते. झोपडीत एक मुलगी आलेली आहे हे दिसताच तिला समाधान वाटले. ती खोल गेलेल्या आवाजात म्हणाली, "बाळ, मला थोडं पाणी दे."

जलवंतीने पाहिले, भांड्यात पाणी नव्हते. तिला काय वाटले कोणास ठाऊक! तिने एकदम म्हातारीला म्हटले, "आई, यात पाणी नाही. कोठून पाणी आणायचं ते सांग. मी घेऊन येते चटकन. मला माहीत नाही कुठं पाणी आहे ते!"

"पलीकडं एक लहानसा ओहोळ वाहतो. त्याचं पाणी रोज आणते मी. पण दोन दिवस ताप आल्यामुळं मला ओहोळावर जाता आलं नाही."

जलवंतीने एक भांडे घेतले व ती ओहोळावर गेली.

ओहोळ खळखळ वाहात होता. त्याचे गोड संगीत सुरू होते. पाखरे गात होती. जलवंतीला वाटले, येथून हलू नये. पण तिला थांबणे शक्य नव्हते. झोपडीत म्हातारी पाण्यावाचून तळमळत होती. नकळत जलवंतीच्या मनात म्हातारीविषयी विचार आला–तिच्याकरता आपण पाणी नेले पाहिजे, तिला मदत केली पाहिजे. ती संकटात, दुःखात आहे. तिला मदत करणे आपले कर्तव्य आहे



असे वाटू लागले. दुसऱ्याकरता आपण काहीतरी केले पाहिजे, ही जाणीव आता तिच्या मनात उत्पन्न झाली होती.

जलवंती पाणी घेऊन आली. तिने म्हातारीला पाणी पाजले. म्हातारीला उत्साह वाटला. थोड्या वेळाने तिचा तापही उतरला. तिला घाम आला. जलवंतीने तिचा घाम पुसून काढला. म्हातारीला बराच उत्साह वाटू लागला.

जलवंतीच्या साहाय्याने म्हातारीने थोडासा भात शिजवला. झोपडीसमोर गाय उभी होती. जलवंतीला म्हातारीने दूध काढायला सांगितले. म्हातारीने एका पेल्यात दूध ओतून ते जलवंतीला प्यायला दिले. जलवंतीला ते अमृतापेक्षाही अधिक मधुर वाटले.

दोघींनी दूधभात खाल्ला. म्हातारीला आता पुष्कळच बरे वाटू लागले. आता तिने जलवंतीची विचारपूस करायला सुरुवात केली.

"बाळ, तू कोठून आलीस ?"

"मी वाट चुकून इकडं आल्ये."

"तुझं नाव काय ?"

"माझं नाव जलवंती." ती एकदम बोलून गेली.

"तुझे आईबाप कुठं असतात ?"

"मला कोणीच नाही. मी एकटीच आहे."

"मीही एकटीच आहे, बाळ. मला मुलगा होता तो समुद्रावर मासे धरायला जात असे. एके दिवशी खवळलेल्या समुद्रानं त्याचा घास घेतला. मी म्हातारी मागं राहिले. देवानं मला नेलं असतं त्या ठिकाणी तर किती बरं झालं असतं! मी फुटक्या नशिबाची." म्हातारी रडू लागली.

जलवंतीने आपल्या नाजूक हातांनी म्हातारीच्या गळ्याला मिठी मारली. नंतर तिने हळूच तिचे अश्रू पुसले.

"आई, किती दुःख करणार ? होऊन गेलेल्या गोष्टीला काही उपाय आहे का ? मन आवरलं पाहिजे." जलवंती म्हणाली.

"बाळ, मन आवरलं पाहिजे हे मला कळतं, पण कसं आवरायचं मन ? अगदी फुटून जाऊ पाहातं हृदय !"

"मला समजतं ते आई !"

"नाही बाळ, तुला अजून कळणार नाही. मुलाच्या मृत्यूनं आईच्या हृदयावर कसा घाव बसतो हे तुला कळणं कसं शक्य आहे ?"

"का बरं मला कळणार नाही ?"

"तू आई होशील तेव्हा आईच्या हृदयाची तुला कल्पना येईल !"

म्हातारीच्या मनाचा कढ बराच शांत झाला होता. तिने जलवंतीला आपल्या कुशीत ओढून घेतले. काही वेळ दोघी जणी स्तब्ध बसल्या.

"बाळ, तुला कोणी नाही ना ?" काही वेळाने म्हातारी म्हणाली.

"थोड्या वेळापूर्वी मला तसं वाटत होतं! आता नाही तसं वाटत." गंगामाईच्या चेहऱ्याकडे पाहात जलवंती म्हणाली.

"मलाही तसंच वाटत होतं. पण आता मला कळलं आहे, मला एक मुलगी आहे."

"आई, ही पाहा तुझी मुलगी ! तू माझी आई !" गंगामाईच्या कुशीत शिरत जलवंती म्हणाली.

"बाळ, मला म्हातारीला टाकून जाणार नाहीस ना ? एक मुलगा होता तो टाकून गेला. तशी तू टाकून जाऊ नकोस बरं."

"नाही आई, मी तुला टाकून जाणार नाही."

तिने म्हातारीच्या तोंडाकडे पाहिले. म्हातारीच्या चेहऱ्यावर समाधान दिसत होते.

—के. नारखेडे

**अभ्यास :**

१. जलवंती ही कोण होती ? तिला जमिनीवर का राहावे लागले ?
२. फिरत फिरत जलवंती कुठे जाऊन पोचली ?
३. जलवंतीला कोणकोणती कामे करावी लागली ?
४. जलवंतीला जमिनीवर आल्यावर कोणकोणत्या नवीन गोष्टी समजल्या ?
५. जलवंतीने कोणाला आई मानले ? या आईला तिने कोणते आश्वासन दिले ? का ?
६. पुढच्या अमावास्येला जलवंती परत पाण्यात जाणार होती. तिला जाणे भागच होते. जाताना तिच्या मनात कोणते विचार असतील ? जलवंतीच बोलते आले आहे असे समजून लिहा.

**व्याकरण :**

१. रिकाम्या जागी योग्य क्रियापदे लिहून वाक्ये पूर्ण करा :
   (अ) जलपरीच्या मैत्रिणी तिला सोडून…………
   (आ) चमनलालांनी जिवाची पर्वा न करता वाघिणी मागे…………
   (इ) मी रोज फिरायला…………
   (ई) पुस्तकातील चित्रे छान…………, मला हे पुस्तक…………
   (उ) मी उन्हाळ्याच्या सुटीत पोहायला…………



## २२. माझे घड्याळ

घड्याळ माझे नवे असे;
सुंदर दिसते पहा कसे !
दादाचे तर जुने मुळी;
झुरळांची वाटे खोली !
घड्याळ माझे लखलखते;
सांग कोणचे आवडते ?

‘उगाच वटवट बोलु नये
कटकट कोणा करू नये;
–तूच नाहि का म्हणत असे ?
किटकिट त्याची सदा असे.
दिवसा किटकिट,
रात्री किटकिट,
घड्याळ माझे गुणी मुळी
कटकट कधि ना करी खुळी !

गडबड करिता मार मिळे,
हेहि न त्याला कसे कळे ?
रात्री निजण्याच्या वेळी
दादा त्याचा कान पिळी;
कुरकुरते, परि ना खळते,
रागाने चिडुनी जाते;
झोप लागते दादाला,
ते नच खपते पण त्याला;
पहाट होता गुरगुरते,
दादाला जागे करते.
दादा उठतो,
चिमटा घेतो,
तेव्हा मग ते गप्प बसे,
घड्याळ माझे कधि न असे !

रात्री नाशिवी कोनाडे;
दिवसा करिते पुढेपुढे.
उगाच बसते ऐटीत
हालवीत अपुले हात;
लहानमोठे हात तसे
पाहुन येई मला हसे.
लाज तयाला ना त्याची;
खोड कोठची जायाची ?
हात असे फिरवुन आधी
मोडुन घेते कधी कधी !
वैद्य आणुनी,
हात जोडुनी,
दादा देतो पुन्हा जरी,
फिरवित बसते हात तरी !
घड्याळ माझे परी पहा;
चाळा त्याला मुळी न हा.

घड्याळ दादाचे, आई,
सर्वांना करिते घाई.



खेळ रंगला असे जरी
मधेच दादा पुरा करी.
गोष्ट न राजाची सरली;
बाबा म्हणती 'छे, झाली.'
घड्याळ असले
कुणास सुचले ?
घड्याळ माझे गुणी परी,
किती वाजले पहा तरी !
सकाळचे अवघे सात;
म्हणती खेळा बागेत.

—विंदा करंदीकर

अभ्यास :

१. दादाचे घड्याळ कसे आहे? ते काय काय करते?
२. दादाच्या घड्याळाला कोणत्या खोड्या आहेत?
३. आपले घड्याळ गुणी आहे, असे त्या मुलाला का वाटते ?
४. गुरगुरणे, कुरकुरणे यांसारखे आवाज करणारे इतर शब्द सांगा.

# २३. सुधास पत्र

'साधना' कार्यालय,
आर्थर रोड, मुंबई ११,
दि. १३ सप्टेंबर, १९४९.



चि. प्रिय सुधास,
सप्रेम आशीर्वाद,

माझे पत्र मिळाले असेल. तुझे सुंदर अक्षरांतील पत्र वाचून आनंद झाला. अक्षर सुंदर असावेच. सारेच सुंदर असावे. काही काही लोकांचे अक्षर वाचता येत नाही. (सही तर अशी ठोकून देतात, की ब्रम्हदेव आला तरी त्याला उलगडा व्हायचा नाही. समजू नये म्हणूनच जणू ती असते.) सुधा, छापखान्यात खिळे जुळवणारे असतात ना, त्यांना अक्षर लावता लावता किती कष्ट पडतात! अशा लेखांच्या पुन्हा प्रती लिहून काढाव्या लागतात. मनुष्य दुसऱ्यांचा विचार करील तर स्वच्छ लिहील. आणि दुसऱ्यांचा विचार करायला जो शिकला त्याच्या जीवनात धर्म येऊ लागला. धर्म म्हणजे केवळ समुद्रात अंघोळ करणे नव्हे; गडावर जाणे नव्हे. धर्म म्हणजे दुसऱ्यांच्या भावना ओळखायला शिकणे, इतरांचे सुखदु:ख पाहणे, त्यांच्याशी एकरूप होणे.

तुम्ही सुट्टीत पत्ते खेळत असा. सारी कामे आटोपल्यावर थोडा विरंगुळा म्हणून पत्ते खेळायला हरकत नाही. एका अमेरिकन लेखकाने लिहिले आहे, 'पत्ते खेळताना आपण आपल्या भिडूचा विचार करतो. हातात पाने नसता उगीच वाटेल तसे बोलू तर आपला भिडू रागावेल. आपण एकटे नाही. दोघे जण आहोत. एकमेकांचा विचार केला पाहिजे.' पत्र लिहिताना, काहीही करताना असाच दुसऱ्यांचा विचार करावा.

तुमच्या शाळेचे गटवार खेळ सुरू झाले. छान! आणि वाचनाचाही कार्यक्रम झाला म्हणून लिहिलेस. तुझ्या गटाला पहिला क्रमांक मिळाला. तू आनंदली असशील! तू वाचताना मधून जरा घुटमळलेस, खरे ना? सवयीचा परिणाम असतो हा. वाचनसुद्धा एक कला आहे. लेखकाने लिहिलेले समजून वाचले पाहिजे. त्या त्या विचाराप्रमाणे आवाज गंभीर, खेळकर, करुण असा व्हायला हवा. वाचनात तुमचा गट पहिला आला. आता इतर बाबतींत बघू. खेळातही पुढे या. परंतु ही सारी गंमत आहे. त्या त्या वेळेस सारे जीव ओतून करावे. कोणासही पहिला क्रमांक मिळाला तरी खट्टू होऊ नये. हे तर शिकायचे आहे. खेळात हीच गंमत. खेळ ही पवित्र गोष्ट आहे. आपल्याकडे खेळ म्हणताच गोपाळकृष्ण आणि त्याचे सवंगडी आठवतात. कृष्ण परमात्म्याला यमुनेच्या तीरावर सोबत्यांबरोबर खेळताना किती धन्यता वाटे! गोपाळकृष्णाने खेळांना दिव्यता दिली आहे.

आषाढ महिना थोड्या दिवसांनी संपेल. पुढे श्रावण आला की सुट्याच सुट्या. पाऊस भरपूर आहे आणि तो सर्वत्र आहे. मध्यंतरी लोकांच्या तोंडचे पाणी पळाले होते; परंतु आता आनंद आहे. शेतीची कामे जोरात सुरू आहेत. यंदा 'अधिक धान्य पिकवा' मोहीम. सुधा, आज सर्वच बाबतींत भारत दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहणारा झाला आहे. आपण अन्न आणि वस्त्र या बाबतींत स्वावलंबी झालेच पाहिजे. जेथे जेथे शक्य आहे तेथे तेथे काहीतरी लावू या. भाजी लावा, रताळी लावा, कणगरे लावा, मका लावा. आपण खाण्याच्या सवयीही बदलू या. रताळी, आठिळ्या, आंब्याच्या कोयी, कणगरे, करिंदे, नाना प्रकारचे पाले—सारे उपयोगात आणू या. अन्न म्हणून समजू या. तुझ्या गावाजवळ कोसबाड आहे. तेथे 'आदर्श शेती विद्यालय' आहे. उन्हाळ्यात तेथे भरपूर रताळी लावली होती आणि शेकडो वारली बंधू तेथून ती विकत नेत. पुन्हा ती स्वस्तही ठेवली होती. असे कळते की, पावसानंतर तेथे टमाटे वगैरे शहरी पिके न घेता भरपूर रताळी करणार आहेत. हजारो गोरगरिबांना उपयोग होईल. आंबे, फणस, काजू यांवरच राहतात हे लोक.

आपल्या गावात पुष्कळ वर्षांपूर्वी आजोबांनी प्रथम रताळ्याची लागवड केली होती. मला आठवते ती गोष्ट. मी लहान होतो. मातीचे उंच बांध करून त्यांवर त्यांनी वेल लावले. केवढाली रताळी खाली लागली होती ! आणि आई रताळ्याच्या पाल्याची डाळ-कण्या घालून भाजीही करायची. भोपळीच्या पाल्याची व फुलांचीही भाजी होते. भोपळी म्हणजे दुधीभोपळा नव्हे. लाल भोपळा. त्याचे ते धोत्र्याच्या फुलासारखे परंतु भगवे फूल किती सुंदर दिसते ! लढाईच्या काळात रशियात साखर भरपूर मिळेना. साखर तर आहारात हवी. हाडे बळकट व्हायला साखर उपयोगी पडते. रशियात हे तांबडे भोपळे लावण्यात आले. या भोपळ्यांत साखर असते. काही काही इतके गोड असतात, की भाजीत गूळ घालावा लागत नाही. पपईसारखी फोड लागते.

काल जानकीकाकू इतक्या म्हातारपणीही शेतावर गेली होती. माझी आई शेतावर जाई. आजीही जाई. ज्या वेळेस लावणी करायची असते, तेव्हा सर्वांना कामाला जावे लागते. शेतात चिखल आहे, पाणी आहे तोच सारे झाले पाहिजे. जानकीकाकू, मथी बायतीण, सीता कदमीण त्याही बरोबर. भेदभाव नष्ट झाले होते. सारी श्रमजीवी. पावसात काम करून सायंकाळी घरी येऊन व कोरडे नेसून चुलीजवळ जरा शेकत बसणे, यात केवढी कृतार्थता असते !

फुलांना आता बहर येत आहे. बटमोगऱ्याला भरपूर फुले. परड्या भरभरून काढली तरी संपत नाहीत. अनंतालाही बहर आहे. गावातील काही बायकांनी दुर्वांचा लक्ष वाहायचा संकल्प केला आहे. कितीतरी बायका शेताच्या बांधावर जातील, हिरव्यागार झुपकेदार दुर्वा वेचतील, एकमेकींचा लक्ष पुरा करतील. अशा निमित्ताने आपण सृष्टीत जातो. वृक्ष-वनस्पतींची ओळख होते. दुर्वा, तुळस, बेल यांना आपण का महत्त्व दिले आहे, माहीत आहे? एकदा आयुर्वेदाच्या तोंडी परीक्षेच्या वेळेस देवाला दुर्वा, तुळशी का वाहतात असा प्रश्न परीक्षकांनी विचारला. मुले चिडली. असले काय प्रश्न विचारता असे म्हणाली.

परीक्षक म्हणाले, "चिडू नका, पूजेसाठी रोज दुर्वा, तुळस, बेल हवा म्हणून घराभोवती यांची लागवड हवी. आयुर्वेदात यांच्या रसाचे महत्त्व आहे. वाटेल तेव्हा रात्रंदिवस तुळस मिळायला हवी." असा हा महिमा आहे. तुझे आजोबा रोज एकवीस दुर्वांची जुडी गणपतीला वाहायचे. त्यांना वाळलेल्या दुर्वा चालत नसत. लांब जातील पण छानदार दुर्वा आणतील. दुर्वा पाहताच मला त्यांची आठवण येते.

काल रात्री मी अंगणात एकटाच फिरत होतो. किती वाजले होते कळेना. थोड्या वेळाने कोंबडा आरवला. म्हणजे प्रहरभर रात्र असावी. पाऊस थांबला होता. केळांच्याच्या डोक्यावर चंद्र होता. ढगांबरोबर तो लढत होता. थोडा थोडा दिसे, परंतु क्षणात अजिबात दिसेनासा होई. तो पुन्हा तोंड वर करी आणि हसे! मी बघत होतो. सुधामाई, आपले मन असेच आहे. अंधाराशी, निराशेशी ते झगडत असते. क्षणात निरुत्साही विचार त्याला बुडवतात तर पुन्हा उत्साहाचे त्याला भरते येते. मोठी गंमत आहे. जीवन म्हणजे ओढाताण; परंतु आपण विजयी होऊ या श्रद्धेने धडपडत राहिले पाहिजे. आत्मविश्वास हवा. ज्याचा स्वतःवर विश्वास नाही त्याच्या जीवनाला काय अर्थ?

तू स्वतःवर विश्वास ठेव. गणित येईल, शास्त्र येईल, सारे मला येईल असे म्हण. काहींना गणित, विज्ञान म्हणजे बाऊ वाटतो. तुम्हांला असे नाही वाटता कामा. आपल्या बाबूकाकांची मंदा यंदा बी. ए. ला गणितात ७० टक्के मार्क मिळवून उत्तीर्ण झाली. मुलींना सारे येईल. मादाम क्यूरीने शोध नाही लावले? सुधा, तुला डॉक्टर व्हायचे ना? मग शास्त्राकडे लक्ष दे. उत्साहाने अभ्यास कर. एक क्षण वाया दवडणे म्हणजे गुन्हा वाटू दे. मुंबईला यंदा पहिला आलेला तो वसंता! लहानशी खोली, घरी दहा-बारा माणसे पण तेथेच तो अभ्यास करी. त्या मानाने इतरांना किती सुखसोयी असतात. इच्छा हवी, उत्कटता हवी, महत्त्वाकांक्षा हवी. मी काहीतरी करून दाखवीन, पुढे येईन अशी महत्त्वाकांक्षा धर. ज्या जीवनात महत्त्वाकांक्षा नाही ते काय कामाचे? प्रयत्न करीत राहावे, खरे ना?

सारी आनंदी असा. विहिरी भरल्या असल्या तर पोहायला जा. उड्या मार. सर्वांस सप्रेम प्रणाम, अरुणाला बे बे! (म्हणजे बेदाणा. तिला तो फार आवडतो, होय ना?)

तुझा,

अण्णा

—साने गुरुजी

**अभ्यास :**

१. लेखकाने सुधाला कोणकोणत्या गोष्टी करायला सांगितल्या आहेत?

२. खेळांचे कोणते महत्व या पाठात सांगितले आहे?

३. लेखकाने आपल्या लहानपणच्या कोणकोणत्या आठवणी सांगितल्या आहेत?

४. 'दुसऱ्याचा विचार करावा' असे का म्हटले आहे?

५. 'आपण खाण्याच्या सवयीही बदलू या.' म्हणजे आपण काय करावे?

६. वाक्ये पूर्ण करा :

* क्षणात······विचार त्याला·······तर पुन्हा·········त्याला·······येते.
* ज्याचा·······विश्वास नाही त्याच्या·······काय········?
* ज्या जीवनात··········नाही ते················?

७. हे पत्र तुम्हांला लिहिले आहे असे समजा आणि अण्णांना उत्तर लिहा.

**व्याकरण :**

(अ) शेतीची कामे जोरात सुरू आहेत. (आ) तेथे 'आदर्श शेती विद्यालय' आहे. (इ) मी सकाळी दहापर्यंत घरीच असतो. (ई) थोडा विरंगुळा म्हणून पत्ते खेळायला हरकत नाही.

'आहेत', 'आहे', 'असतो' 'नाही' हे शब्द वरील वाक्यांत आले आहेत या शब्दांमुळे वस्तूचे असणे किंवा नसणे हे कळते. व्याकरणात यांनादेखील क्रियापदे म्हणतात.

२. रिकाम्या जागी योग्य क्रियापदे लिहा :

(अ) चंद्र उगवला की अंधार थोडा कमी·········· (आ) नदीकाठी शंकराचे देऊळ·········· (इ) शेत नांगरले, आता शेतात कुठलेच पीक··········

# २४. दुधावरची साय

बाहेर आकाश गुदमरलेले होते. ढगांचा गडगडाटही मधून मधून ऐकायला येई. रस्त्यावरील धूळही सोसाट्याने उडत होती. पालापाचोळाही त्या धुळीच्या विमानात बसून प्रवास करत होता. रस्त्यावरची रहदारीही अत्यंत तुरळक अशी झाली होती.

इतक्यात पुन्हा एकदा आकाशात गडगडाट झाला. विजेनेही त्यातच चमक मारली आणि थाड् थाड् असा गारांचा पाऊस सुरू झाला.

उडणारी धूळ आणि तो पाऊस यांची मध्यंतरी भेट होऊन ती खाली येत होती. त्यामुळे एक प्रकारचा सुवास येत होता. पाऊस आल्यामुळे आजूबाजूच्या घरांची खिडक्या-दारे खाड् खाड् लावली गेली.

काही मुले वडीलधाऱ्या माणसांची नजर चुकवून गारा गोळा करण्याकरता वळचणीला पागोळ्यांच्या आड उभी होती.

पावसाच्या धारा झपाट्याने खाली येत होत्या! गाईच्या आचळांतून दूध काढावे तसे मला वाटत होते ते!

इतक्यात भयंकर गडगडाट झाला. कुठेतरी वीज पडली वाटते. पुन्हा पाऊस सुरू झाला. पावसाचे पाणी अंगणात चांगले वीतभर साचले. त्या साचलेल्या पाण्याच्या पृष्ठभागावर पाण्याच्या थेंबांच्या सरींनीच पाऊस वाजंत्री वाजवत होता.

पुन्हा एकदा बाहेर वीज कडाडली आणि त्या वेळी घरात आई ओरडली,

"शांते, कार्टे आहेस तरी कुठं?"

इतका वेळ पावसात गारा वेचून, परकराच्या ओच्यात काही गारा घेऊन शांती चोरासारखी दरवाजाच्या आडोशाला उभी होती. आईला चोरून ती पावसात खेळली. तिने गारा खाल्ल्या, वेचल्या. पावसाने तिचे केस भिजले, परकर भिजला.

"शांते, कार्टे आहेस तरी कुठं?" पुन्हा आई ओरडली, तशी थरथर कापत

शांती पटकन घरात शिरली. पावसात भिजल्याने तिला हुडहुडी भरली होती आणि आई रागावेल या भीतीनेही ती कापत होती. अशा स्थितीतही गोळा केलेली एक गार तिने तोंडात टाकली.

शांती तशा स्थितीत घरात शिरली; पण आईला तिची चाहूल लागली नव्हती. आई घरातून तशीच ओरडत ओटीवर आली, 'अरे, तू तरी पाहिलंस का तिला कुठं? कुठं गेली कुणास ठाऊक!"

तोच शांती आईच्या दृष्टीस पडली. आईने शांतीकडे रागाने पाहिले मात्र, ती जास्तच घाबरली. तिने आपल्या परकराचा हातात धरलेला सोगा सोडून दिला. वेचून आणलेल्या बहुतेक गारांचे पाणी झाले होते!

"कार्टे, माझा डोळा चुकवून मरायला गेलीस का?"

शांती माझ्या बहिणीची मुलगी. तिला आज नववे वर्ष लागले होते आणि तिच्या आईला म्हणजे माझ्या बहिणीला मरून आज आठ वर्षे झाली होती. शांतीच्या वेळी बाळंतपणाकरता म्हणून ती जी आमच्याकडे आली, ती परत घरी न जाता परलोकातच गेली. तेव्हापासून शांती आमच्याकडे होती. ती माझ्या आईला, म्हणजे तिच्या आजीला आईच म्हणे. पोरगी मोठी गुणाची; पण खोडकर होती. भयंकर अवखळ! सकाळपासून रात्रीपर्यंत दोन-चार जिनसांची पडझड तिच्या हातून झाली नाही असा दिवसच विरळा!

आईही तिच्यावर खूप संतापत असे. आई तिच्याशी नेहमी त्राग्यानेच वागे. तिचे आपले एक पालुपद— माझी पोरगी मरून गेली अन् तिची ही कार्टी राहिली आहे मला छळायला मागं!

मनुष्य किती खोटे बोलत असतो प्रत्येक वेळी! आईने हा छळ आपण-होऊनच मागे लावून घेतला होता. शांतीचे वडील तिला आपल्या घरी घेऊन जायला तयार होते; पण आई कुठे पाठवायला तयार होती? "नको ग बाई! माझ्या पोरीची आठवण. मी नाही तिकडं पाठवणार—काय कार्टीला मला छळायचं असेल ते छळून घेऊ दे! माझ्या पोरीचं माझ्या हातून काही कमी झालं असेल ते ती आता फेडून घेतेय शांतीच्या रूपानं."

“कार्टे, माझा डोळा चुकवून पावसात कशाला गेली होतीस मरायला?”

शांती थरथर कापत म्हणाली, “पुन्हा नाही जाणार.”

“दर वेळेला तुझं हे असं आहे. काय ग? ते दुधाचं पातेलं कुणी सांडलं?”

“माझ्या हातून पडलं.”

“पण हात कशाला लावायला गेली होतीस त्याला?”

“तू स्वैपाकघरात नव्हतीस. मांजर खाईल म्हणून मी परकरानं उचलून ठेवायला गेले कपाटात; ते पडलं माझ्या हातून.”

“बरं तर बरं. माझं नशीब बरं. अंगावर सांडून भाजली नाहीस.”

शांतीने ओळखले, आता माराशिवाय आपली सुटका नाही. तिने अगोदरच रडायला सुरुवात केली; तसा आईलाही चेव आला. “कार्टे, मी मारायच्या अगोदरच का रडतेस? थांब हो, मग मारतेच तुला तर मी.”

आई उठली. तिने दोरी घेतली. “ये पाहू कार्टे इकडं!”

शांती समोर आली. आईने तिचे हात धरले.

बाहेर पुन्हा वीज कडाडली. कडाड् – लखकन प्रकाश – पुन्हा आवाज – आणि पाऊस!

“आई, मारू नको ग!”

“मग कशाला गेली होतीस पावसात?”

“गारा वेचायला. मी तुझ्याकरताच आणणार होते गारा गोळा करून.”

आईने हात उगारला.

का कुणास ठाऊक, शांती थोडी धीट बनली आणि थोड्याशा हळू आवाजात आईला म्हणाली, “मला तू मारू नकोस.”

“अग, चहाटळे! माझी पोर मरून गेली आणि तिची ही कार्टी राहिली आहे मला छळायला.” आई पुन्हा पुन्हा तेच तेच म्हणत होती.

“तेच सांगते आई. दुधापेक्षा दुधावरच्या साईलाच जास्त जपावं लागतं.” शांती म्हणाली.



वरील प्रश्नोत्तरं मी बाहेर बसून ऐकत होतो.

कोण, कोण सांगते आहे हे? शाती? नऊ वर्षांची चिमुरडी? मलासुद्‌धा हे उत्तर सुचले नसते. मग शांतीने कसे दिले?

हे काही शांतीचे उत्तर खास नव्हे. शांतीच्या तोंडून हे कोणीतरी दिले आहे.

शांतीच्या तोंडून कोण बोलणार? दुसरे कोण? तिची आई.

मी ओटीवर आलो आणि ओटीवरच्या खांबाला टेकून समोर पाहू लागलो. पाऊस पडत होता.

मी उघड्या डोळ्यांनी पाहात होतो. का कुणास ठाऊक, माझ्या मनाचे समाधान झाले. माझ्या डोळ्यांत पाणी आले. माझी मृत भगिनी या अफाट

देखाव्यात कुठे तरी असेल, अशी कल्पना करून त्या देखाव्यालाच मी नमस्कार केला आणि चटकन डोळ्यांत आलेले पाणी पुसून घरात आलो.

आजीच्या आणि नातीच्याही डोळ्यांतून अश्रूंचे सर ओघळत होते. दोघीही एकमेकींना निरखून पाहात होत्या. इतक्यात शांतीचा मुका घेत आई म्हणाली, "माझी दुधावरची साय ती!"

—य. गो. जोशी

**अभ्यास :**

१. आजी शांतीवर का रागावली होती?
२. शांतीने आजीला कायकाय सांगितले?
३. शांतीचा स्वभाव सांगणारे कोणकोणते शब्द या पाठात आले आहेत?
४. शांतीला आजीने आपल्याकडेच का ठेवून घेतले होते?
५. शांतीला 'दुधावरची साय' असे का म्हटले आहे?
६. 'मी पाहिलेले वादळ' यावर सात-आठ वाक्ये लिहा. वादळाचे वर्णन करणाऱ्या शब्दांचा वाक्यांत उपयोग करा.

**व्याकरण :**

१. 'होणे' या क्रियापदाची योग्य रूपे रिकाम्या जागी लिहा :
   (अ) दहा वाजता आमचे जेवण ................
   (आ) समुद्र शांत ................
   (इ) माथेरानच्या प्रवासात आमची काहीच गैरसोय ................ नाही.
   (ई) आजीला फार आनंद ................
२. खालील शब्दांपैकी क्रियापदे कोणती ते ओळखा :
   दिला, देईन, तुम्हांला, शहाणा, पडली, गाणी, म्हणाली, पेळू, सांडले, नागपूर, नाही.

# २५. वाट

मला आवडते वाट वळणाची
दाट झाडीची नागमोडीची
ही अलिकडची नदीच्या थडिची
मला आवडते वाट वळणाची

मला आवडते वाट वळणाची
सरघसरणिची पायफसणीची
लवणावरची पानबसणीची
मला आवडते वाट वळणाची

मला आवडते वाट वळणाची
अशि भुलवणिची हुलकावणिची
सागवेळूच्या भर रानींची
मला आवडते वाट वळणाची

मला आवडते वाट वळणाची
जरा अडचणिची चढउतरणिची
घाटमाथ्याची ती पलिकडची
मला आवडते वाट वळणाची

मला आवडते वाट वळणाची
इथची तिथची कधि कुणिकडची
क्षितिजाकडची पुढची पुढची
मला आवडते वाट वळणाची!

—अनिल

**अभ्यास :**

१. कवीला वळणाची वाट का आवडते ?

२. पुढील शब्दांचे अर्थ समजावून घ्या :
भुलवण, हुलकावणी, लवण, सरघसरण, पायफसणी.

३. चढ-उतरण, सर-घसरण यांसारखे इतर शब्द तुम्ही ऐकले आहेत काय ? कोणते ?

# २६. गोवर्धनगिरिधारी



[पडदा उघडतो त्या वेळी गोपांचे समूहगीत सुरू असते.]

टपटप पाउस पडू दे
टपटप पाउस पडू दे
झटपट सगळ्या रानावरती हिरवी माया चढू दे!
झरझर पाउस पडू दे
सरसर पाउस पडू दे
भरभर ढवळ्या गाइगुरांवर वर्ख रुपेरी जडू दे!
इंद्रा इंद्रा पाउस पाड
चंद्रा लपु दे मेघाआड
इंद्रधनूच्या पुलाखालुनी ढवळा बगळा उडू दे!

**कृष्ण :** (प्रवेश करून) काय रे पेंद्या, आज सकाळपासून गाण्याला जोर चढला आहे?

पेंद्या : किसना, तू इसरलास न्हवं? अरं आज इंद्रदेवाचा सण हाय. कारं बोबड्या, खरं का खोटं?

बोबड्या : थोटं नाही. आज इंदलाची पूजा तलायची. सदल्या दौल-वाड्यात आज दंमत दंमत आहे. धाऊची तल चंदल होईल.

वाकड्या : कृष्णा, आपण सगळे वृंदावनात इंद्रमहाराजांची पूजा करू. तू बासरी वाजव. आपण गाऊ, आरती करू.

कृष्ण : मी बासरी वाजवीन, तुम्ही गा. पण इंद्राची आरती कशाला करायला हवी आहे? इंद्राची पूजा आपण गवळ्यांनी का म्हणून करायची?

पेंद्या : अरं, म्हंजे काय बोलनं झालं का काय? दर वर्साला अशी पुंजा होत असती.

कृष्ण : मग या वर्षापासून बंद.

चतुऱ्या : कृष्णा, सगळी माणसं रागावतील बरं! नंदमहाराज, यशोदामाई तुला शिक्षा करतील.

वाकड्या : अरे, इंद्र देवांचा देव!

कृष्ण : असेल, पण आपला गोपांचा देव वेगळा आहे.

चतुऱ्या : गोपांचा देव हा गोपाळ. चला रे या कृष्णाचीच आपण पूजा करू.

(सगळे : हो, हो, कृष्ण आपला देव.)

कृष्ण : थांबा, मी तुमचा देव नाही. पेंद्या, चतुऱ्या, आपल्या गाईगुरांना दूध किती असतं?

पेंद्या : असतं मायंदाळ. माजी तांबू गाय सक्काळसांज घागरभर दूध देती. बकऱ्या गाईचं दोन दोन चरव्या.

वाकड्या : अरे हो, माझी लंगडी गायदेखील दीड चरवी दूध देती.

बोबड्या : आमची ताली ताली दाय आहे ना, ती पांडली फेत दूध देती. धादलभल दूध, वल तासंडीभल फेस.

कृष्ण : पण ह्या साऱ्या गाईंना पोटाला अन्न कुठं मिळतं?

चतुऱ्या : रानात मस्त चारा खात्यात त्या.

**कृष्ण :** मग गोकुळचं रान मोडून कशाला आलो आपण?

**पेंद्या :** इथली डोंगररानं लई लई झ्याक हैत. हिरवंगार गवत एवढं वाडलंया.

**चतुऱ्या :** खरंच कृष्णा, या गोवर्धन पर्वताचं नाव अगदी बरोबर आहे. आपल्या गाईंना तोच वाढवतो, तोच पोसतो.

**वाकड्या :** डोंगराच्या टेकाडावर उभं राहिलं की लांब यमुनामाई वाहताना दिसते.

**चतुऱ्या :** वडाचं झाड दिसतं.

**पेंद्या :** पार जिथं आभाळ टेकतं तिथपतूर गवताची रानं दिसतात हिरवी आन् वरती ढवळ्या तांबड्या गाईंची शोभा लई झकास दिसती. पण किसना, तू बोलत का न्हाईस?

**कृष्ण :** वेड्यांनो. आपला देव हा गोवर्धन डोंगर. तुमच्या देवता म्हणजे ही यमुनाबाई, ही हिरवी धरित्री. यांची पूजा करायची. आपण गवळी. ही खिल्लारं म्हणजे आपलं सगळं काही. या खिल्लारांना पोसणारी ही रानं या डोंगरावर वाढतात. गार वाऱ्यांनी हा गोवर्धन आपल्याला सुख देतो. तोच ढग अडवून पाऊस पाडतो. गोवर्धन पर्वत हाच आपला देव. चला, आज याचीच आपण पूजा करायची. जा, सगळ्या गौळवाड्यात जाऊन सांगा – आज आम्ही गोवर्धनाची पूजा करणार –

(सगळे घोषणा करत फिरतात.)

(घोषणा) : इंद्राची पूजा – बंद करा.
गोवर्धनावर – लवकर चला.
गवळ्यांच्या गाई – गवळ्यांचे धन
देव आपला – गोवर्धन

**एक गवळी :** अरे, काय धुडगूस लावलाया? आज इंद्रदेवाची पुंजा करायची न्हवं?

**चतुऱ्या :** इंद्राची? मुळीच नाही. कृष्णाची आज्ञा आहे. आज गोवर्धनाची पूजा करायची.

**दुसरा गवळी** : शानाच दिसतो कृष्ण !

**पहिला गवळी** : म्हंजे आता नंदमहाराजांना इचारायला पाहिजे. राज्य तुमचं का किसनाचं ?

(बासरी वाजवत कृष्ण जाऊ लागतो.)

**पेंद्या** : चतुऱ्या, बोबडया चला कान्हा निघाला रे. आपुनबी जाऊ या.

(सगळी मुले जातात.)

**दुसरा गवळी** : आं ! अरे भीमदादा, त्यो बघ, कृष्णामागोमाग सगळा गौळवाडा निघाला की ! सगळ्या गौळणी, आन् यशोदामाई, नंद-महाराज—अरं चल चल, आपुनबी जाऊ.

**पहिला गवळी** : मंग आपुन काय हितंच न्हायाचं व्हय ? अरं समदी गाईगुरंबी चालली. अन् तू न मी काय शेन्या थापीत बसायचं व्हय ? चल, चल.



(बासरीचे सूर. मिरवणूक गीत गात येते.)

चला चला रे रानात
श्रीकृष्णाची मंजुळ मुरली भरली अपुल्या कानांत
वृक्षलतांसह खेळू या
यमुनातीरी लोळू या
हासत नाचू नाचत हासू गुंगुन रंगुन गानात
थोर असा की बाळ असा
गवळण की गोपाळ असा
अंगतपंगत होइल तेव्हा चंगळ होइल पानात
वंदू या धरतीमाता
पुजु या गोवर्धन आता
गोपसख्यांनो, गोपाळांसह चला वनी अभिमानात.



(एकाएकी मेघगर्जना, विजांचा कडकडाट)

[पडद्यामागून इंद्राचा आवाज : (विकट हास्य) वरुणराज, पाठवा ती मेघांची सेना, जाऊ दे यमुनातीरी. करा हल्ला. मुसळधार पाऊस पाडून सारे गोकुळ बुडवून टाकतो आज. माझा अपमान केला आहे ह्या गोपांनी. यमुना ही प्रत्यक्ष यमाची बहीण. तिच्या अकाळविकाळ लाटांच्या जबड्यात सापडू दे वृंदावन. विद्युल्लते, अशीच चमकत राहा. पुष्करा, आवर्तका, करा प्रलयाला सुरुवात.]

(प्रचंड मेघगर्जना)

**पेंद्या** : किस्ना, अरं केवढा दांडगा पाऊस रे! आता पार समदी भिजून जाणार आपुन.

**चतुऱ्या** : अरे, चला चला, वडाच्या झाडाखाली जाऊ नका. सगळी खिल्लारं बाहेर रानात घ्या.

**वाकड्या** : यमुनेला पूर आलाय केवढा तरी.

**चकण्या** : बगावं तिकडं पानी पानी झालंय.

**पेंद्या** : किस्ना आपलं कळंबाचं झाड पार डुबलं. गाया बुडायला लागल्या.

**एक गवळी** : इंद्रदेवाचा कोप झाला. त्याचा उच्छाव बंद केला आपुन! द्येव रागावला.

**एक गवळण** : आई, आई ग! आता कसं होईल? आपली लहान लहान बाळं कशी वाचायची आता? यशोदे! धाव ग धाव!

**चतुऱ्या** : कृष्णा, खरंच का रे इंद्राचा कोप झाला?

**कृष्ण** : झाला असेल. आपल्याला कसली भीती? आपण कधी कुणाचा घात केला नाही. गाईवासरांना संभाळलं. सर्वांवर उपकार करणाऱ्या रानाची, डोंगराची आपण पूजा केली.

**एक गवळी** : या लहान पोराचं ऐकलं हीच चुकी झाली. नंदमहाराज, आता द्येवाचा कोप कोण निस्तारील?

**पेंद्या** : आलं आलं पानी आलं. आता गोपाळकिस्ना तूच वाचव. (घाबरून) किस्ना, धाव धाव.



**कृष्ण :** थांबा, भिऊ नका. तुम्ही सगळे बाळगोपाळ एक व्हा. तुम्ही इंद्रदेवाला भिऊ नका. चला, लावा काठ्या. उचला गोवर्धनाचा डोंगर.

**एक गवळी :** आता हसावं का रडावं? ही पोरं म्हनं गोवर्धन डोंगर उचलणार? तोंड बगा म्हनावं.

**दुसरा गवळी :** तोंड कशाला बगतो? तकडं बग. डोंगर उचलला किस्नानं. चालला, चालला वर....

**कृष्ण :** अश्शी, शाब्बास शूर मित्रांनो! आता पडू दे पाऊस. वाजू द्या विजा. ढगांनो, ओरडा हवं तितकं. शाबास माझ्या मित्रांनो. गोवर्धन उचलण्याची ताकद तुम्ही दाखवली. आता पाऊस काय करील?

**पेंद्या :** अरं किस्ना, ही ताकद आमची का तुझी?

(सगळे कृष्णाचा जयजयकार करतात.)

एक गवळी : थांबला. पाऊस थांबला.

एक गवळण : अग बया. काय चमत्कार हो हा! एकदम सुर्व्या देव चमकायला लागला.

नंद : या. सारे जण या. कृष्णा, तू धन्य आहेस. आमच्या घरी तू जन्माला आलास. आम्ही धन्य आहोत!

सारे जण : आला पाउस, गेला पाउस, राने ओली झाली रे
मुरली वाजे, महिमा गाजे, मनमोहन वनमाली रे

नंदनंदना गोपाळा
सदैव आम्हां सांभाळा
गोवर्धनधर तू मुरलीधर गोपीचंदन भाली रे

दीन जनांना तारी तू
दुष्टांना संहारी तू
मोरमुकुटपीतांबरवाला तूच आमचा वाली रे

यमुनातीरी तू मनमोर
वृंदावनीचा नंदकिशोर
तू गोपांचा राजा अमुचा त्रिभुवनि तू जयशाली रे.

—वसंत बापट

अभ्यास :

१. या संवादात कृष्णाचे सवंगडी कोणकोण आहेत?

२. कृष्णाने कुणाची पूजा करायला सांगितली? का?

३. कृष्णाची दुसरी कोणकोणती नावे या पाठात आली आहेत?

४. हा संवाद शाळेच्या स्नेहसंमेलनात करून दाखवायचे ठरल्यास—

(अ) कोणकोणत्या पात्रांसाठी मुलांची निवड करावी लागेल?

(आ) पात्रांनुसार कोणकोणते पोशाख आणावे लागतील?

(इ) आणखी कोणकोणत्या गोष्टी जमवाव्या लागतील?



# २७ देवगिरी

औरंगाबादेहून आपण वेरूळच्या लेण्यांकडे जायला निघालो की वाटेतच दौलताबाद् लागते. ही वाट किती नागमोडी आणि वळणावळणाची आहे !

हा समोर किल्ला पाहा. तो किती उंचीवर आहे, पाहिलात ? खरं म्हणजे हा किल्ला मुळी बांधलेला नसून या प्रचंड काळ्या डोंगराच्या पोटात जणू तो कोरलेलाच असावा असे वाटते. पुढे जसजसे या ठिकाणी राजे-महाराजे आले तसतसे त्यांनी या किल्ल्याच्या मजबुतीसाठी तट वगैरे बांधले.

दौलताबादचेच जुने नाव होते 'देवगिरी'. यादव घराण्यातील सिंघण नावाच्या शूर राजाने प्रथम येथे आपले स्वतंत्र राज्य स्थापन केले. या किल्ल्याकडे पाहा. आज किती पडझड झालेली आहे या किल्ल्याची....पण एके काळी याच किल्ल्यावर यादव राजांचे सोन्याचा गरूड असलेले निशाण फडकत होते

हा पाहा तटाचा पडलेला भाग. हा तट सहाशे वर्षांपूर्वी बांधला होता. तटाची भिंतच तेरा फूट रुंद आहे ! किल्ल्याच्या चारी बाजूंना चार मोठ्या वेशी आहेत. त्यांना मक्का दरवाजा, रोझा दरवाजा अशी नावे दिली आहेत. सर्वांत बाहेरचा तट किती लांब असेल बरे ? तब्बल तीन मैल लांब ! एकात एक असे तीन तट इथे आहेत. त्यांना बारकोट, मारकोट आणि काळकोट असे म्हणतात. तीस फूट उंचीच्या प्रचंड वेशीतून अंबारीसह हत्ती सहज जाईल. वेशींची ती प्रचंड महाद्‌वारे पाहिलीत ना ? महाद्‌वारावरील लोखंडाच्या जाड पत्र्यांवर मोठमोठे अणकुचीदार खिळे ठोकले आहेत. शत्रूच्या हत्तींनी धडक मारली तर दार उघडू नये म्हणून ही सोय ! रात्री ही महाद्‌वारे आतून बंद करायची. भले मोठे आगळ सरकवून जाडजूड लोखंडी साखळदंड अडकावला की संपूर्ण किल्ला पोलादी पेटीत ठेवल्याप्रमाणे एकजात बंद !

वेशीच्या पलीकडे जो उंचच उंच मनोरा दिसतो आहे ना, त्याचे नाव आहे चांद मिनार. अल्लाउद्दीन खिलजी नावाच्या सुलतानाने दौलताबाद जिंकले, तेव्हा त्याने मनोरा उभारला.

हा जुना नगारखाना. इथे दररोज चौघडा वाजत असे. कालिकादेवीचे देऊळही जवळच आहे. ते पाहिल्यावर प्राचीन काळची आठवण येते. पलीकडे तो हौद दिसतो आहे ना, त्याचे नाव आहे हत्ती-हौद. हत्तींना पाणी पिण्यासाठी, डुंबण्यासाठी हा प्रचंड हौद बांधला असे म्हणतात.

हा चिनी महाल. एके काळी ही इमारत अत्यंत भव्य व सुंदर होती. आता ती बरीच पडली आहे. येथूनच ती पाहा बारादरी, त्या धान्याच्या कोठ्या आणि दारूगोळ्याची कोठारे ! आता चढण चढू या. चढण हळूहळू अवघड होते आहे नाही का ? खाली पाहा. खालची माणसे किती लहान दिसत आहेत, नाही ? अगदी मुंगीसारखी ! हां, थांबा, आता आपण या बोळाच्या तोंडाशी आलो. येथून आत भुयारी रस्ता असेल असे वाटलेदेखील नव्हते नाही का आपल्याला. ही अंधारी वाट आहे बरे ! जपून या. कुणी भिऊ नका. घाबरू नका. माझ्या मागे या. बॅटरी आहे मजजवळ, तिच्या प्रकाशात चालत या.

या अंधाऱ्या वाटेला लागून जे दोन रस्ते दिसताहेत ना, त्या फसव्या वाटा आहेत. शत्रू चुकून या वाटेने आलेच तर त्यांचा सरळ कडेलोट होईल! घाबरू नका. आता या वाटा आतून बंद केलेल्या आहेत.

आता भुयार संपले. जिन्याच्या वरच्या बाजूला लोखंडी पत्रा उभा करून ठेवलेला आहे ना, त्याला 'तवा' म्हणतात. चुकूनमाकून शत्रू फसव्या वाटा चुकवून इथे आलाच तर या भुयाराच्या तोंडावर हा तवा ठेवीत आणि त्यावर खूप विस्तव पेटवीत. त्यामुळे शत्रूला वर येता येत नसे व तो भुयारातच गुदमरून जाई.

भुयाराची लांबलचक वाट चालून आल्यावर किती दमल्यासारखे वाटते नाही! थोडे थांबा. ती पाहा. ती पलीकडे दोन टाकी दिसताहेत. त्यांची नावे आहेत कवडी टाके आणि मोती टाके. मोठ्या थोरल्या खडकाच्या आत थंड आणि स्वच्छ अशा पाण्याचा साठा आहे तिथे. पाण्याची खोली पाहूनच छाती दडपते. पण या टाक्यांचे पाणी मात्र गोड आणि थंडगार आहे हो! पोटभर पाणी प्याल्यावर किती ताजेतवाने झाल्यासारखे वाटते.

समोर पादुका आहेत ना, त्या जनार्दनस्वामींच्या आहेत. ते संत एकनाथांचे गुरू होते. जनार्दनस्वामींची समाधीही इथेच आहे. आणि पलीकडे जे इटुकले गाव दिसते तेच दौलताबाद. एके काळचे राजधानीचे वैभव आज लोपले आहे. मात्र 'देवगिरी' आजही त्या प्राचीन वैभवाची साक्ष देत उभा आहे....

—न० शे० पोहनेरकर

**अभ्यास :**

१. 'देवगिरी' महाराष्ट्राच्या कोणत्या जिल्ह्यात आहे? आजचे त्याचे नाव काय आहे?
२. पुढील शब्दांचे अर्थ समजावून घ्या : टाके, भुयार, बारादरी, आगळ.
३. पुढील वाक्प्रचारांचा अर्थ सांगा :
ताजेतवाने होणे, छाती दडपणे, कडेलोट करणे, तोंडाशी येणे.
४. तुम्ही पाहिलेल्या एखाद्या गडाचे वर्णन करा.



# २८. सुगी

देवाचं देणं हे देवाचं देणं
सोन्याच्या ताटाला मोत्यांचं दाणं
पिकला शाळू परोपरी
चढली कणसं माथ्यावरी
पाखरं आली भिरीभिरी
गोफण फिरवू माच्यावरी
चला मर्दांनो, चला बायांनो, म्हणा गाणं, तुम्ही म्हणा गाणं
सपसप फिरवू विळे, विळे
आडवे पाडू उभे मळे
घामाचा पाझर खाली गळे
सुकतिल पेंढ्या उन्हामुळे
काम खुषीचं, एकामेकांचं, नगं नाणं आम्हां नगं नाणं



मोडण झाली करून करून
घाणा खळ्याचा गेला भरून
पात जुपा रे बैल धरून
फुटती कणसं फिरून फिरून
खळं दाण्याचं, तळं मोत्यांचं, लुद्द वाण आम्ही लुद्द वाण
सुटला वारा, आल्या झळा
वावडणीला लागू चला
टोपली भरून दे ग तिला
ढीग दाण्याचा उंचावला
चंदी सालाची, किंमत मालाची करिल कोण ? अहो, करिल कोण ?
आनंदाचा दिवस खरा
धनधान्याची पूजा करा
पोती घेऊन भरा, भरा
वाजत गाजत नेऊ घरा
नाचगाण्याची संधी सोन्याची, म्हणा गाणं, अहो, म्हणा गाणं !

—ग० ल० ठोकळ

अभ्यास :

१. तिसऱ्या इयत्तेत असताना तुम्ही सुगीचे वर्णन वाचले आहे. या कवितेत त्या पाठातील कोणकोणत्या गोष्टींची वर्णने आली आहेत?
२. खालील ओळींतील कल्पना स्पष्ट करा :
(अ) सोन्याच्या ताटाला मोत्यांचं दाणं.
(आ) नाचगाण्याची संधी सोन्याची.
३. पुढील शब्दांचे अर्थ समजावून घ्या :
वाण, वावडणे, मोडण, घामाचा पाझर, चंदी.
४. सुगीच्या वेळी तुमच्या वर्गाची एखाद्या शेतावर सहल काढा.



## २९. संत गाडगेबाबा

१९०५ सालच्या फेब्रुवारी महिन्याची पहिली तारीख ! या तारखेला एका तरुणाने आपले घरदार सोडले. संसार, बायकामुले सोडून तो तप करायला निघाला. त्यासाठी तो रानावनात, अरण्यात मात्र गेला नाही. त्या तरुणाचे वय अवघे एकोणतीस वर्षांचे होते.

हा तरुण म्हणजे संत गाडगेमहाराज. त्यांचा जन्म वऱ्हाडात कोतेगाव येथे १८७६ साली एका गरीब परटाच्या घरी झाला. आईबापांनी त्याचे नाव ठेवले डेबू ! पण त्याच्याजवळ सतत गाडगे असायचे. म्हणून त्यांना गाडगेमहाराज म्हणत.

लहानपणी वडील वारल्यामुळे आई डेबूला घेऊन आपल्या भावाकडे येऊन राहिली. डेबू मामाच्या शेतावर कष्ट करू लागला. कोणतेही काम करण्याची डेबूला मनापासून हौस होती. काम करायचे ते अगदी नीटनेटके. आपला हात

ज्याला लागेल ते शुद्ध झाले पाहिजे. सुंदर दिसले पाहिजे—अशी त्याची काम करण्याची पद्धत होती.

काबाडकष्ट करणारे असंख्य लोक असतात. डेबू त्यांच्याहून वेगळा होता. त्याचे मन दयेने भरले होते, मायेने भरले होते. इतरांचे दुःख, दारिद्र्य पाहून त्याचा जीव तुटत होता. तो ज्या समाजात वावरत होता त्या समाजातील लोकांचे वागणे त्याला आवडत नव्हते. ते लोक कर्जबाजारी होते. ऋण काढून सण करत होते. दारू पीत होते. रोगराई झाली तर औषध न घेता देवाला नवस करत होते. कोंबडे-बकरे यांचे बळी देत होते.

डेबूला हे आवडत नव्हते. लोकांनी चांगले वागावे म्हणून तो त्यांना जीव तोडून सांगत होता. त्याने आपल्या जवळपासच्या लोकांची एक संघटना केली. त्यांचे दारू पिणे कमी केले. परंतु लोकांच्या भल्यासाठी जीव तोडून राबणाऱ्या डेबूला एक वेगळाच अनुभव आला. चार चांगल्या गोष्टी सांगितल्या तरी आपले कुणी ऐकत नाही, आपल्या शब्दाला वजन नाही. आई आपल्यासाठी राबते, कष्टते म्हणून आपण तिचे ऐकतो. गाडगेमहाराजांनी मनाशी ठरवले, की मी इतके कष्ट करीन की मी न बोलताही लोक माझे ऐकतील. त्यांच्यात सुधारणा होईल.

झाले! वयाच्या एकोणतिसाव्या वर्षी गाडगेबाबांनी घरादाराचा, सग्यासोयऱ्यांचा त्याग केला. सगळी माणसे हे आपले सगेसोयरे, सगळे विश्व हेच आपले घर असे मानून ते वावरू लागले. गावोगाव भजनकीर्तन करत ते फिरू लागले. समाजात, लोकांत जे दोष दिसत ते जणू आपलेच आहेत. त्याबद्दल आपण दंड भोगला पाहिजे अशी त्यांची भावना होती.

घर सोडल्यानंतर कधी कुणाच्या घरी ते जेवले नाहीत. भीक मागायची अन् गाडग्यात जे पडेल त्याने पोट भरायचे! त्यांनी कधी धड कपडे वापरले नाहीत; चिंध्या घातल्या, पांघरल्या! झोपायला फक्त एक तरट किंवा घोंगडी. उशाला हाताची घडी. कुणाकडे भीक मागायला जावे तर त्याने म्हणावे, 'तू तर चांगला धडधाकट आहेस. माझ्या घरची लाकडे फोडून दे, मग देतो तुला भाकर!' बाबांनी म्हणावे, 'द्या कुऱ्हाड!' कुऱ्हाड हाती आली की

घणाघण ढलप्या पाडून घाम गाळावा. मालकाने भाकर आणायला घरात जावे, तोवर बाबांनी कुऱ्हाड तिथेच ठेवून पसार व्हावे! बाबांचा पत्ता लागायचा नाही. तहान भुकेची पर्वा कोण करतो? भजन, कीर्तन, उपदेश हाच त्यांचा ध्यास.

त्यांच्या भजनाला दहा-दहा हजार लोक जमू लागले. त्यांच्या पायांवर डोकी ठेवायला लोकांची झिम्मड उडू लागली. ते कुणाला पाया पडू देत नसत. कीर्तन संपले रे संपले, की आरतीच्या अगोदर गर्दीतून पळ काढून कुठे तरी ते लपून बसत. लोकांना वाटायचे की बाबा गुप्त झाले! 'लोकांनी सद्‌गुण शिकावे, माझ्या पाया पडून उपयोग नाही,' असे त्यांचे म्हणणे असे.

आणि कीर्तनात ते सांगायचे काय? कळवळून ते म्हणायचे – "बाबांनो, आपणच आपले भले केले पाहिजे. माझ्या लेकरांनो, अरे देव आपल्यातच आहे. त्याला जागा करा. ज्याला तुम्ही देव मानता तो मोठा विचित्र आहे बरं! हा चंद्र, हा सूर्य, ही झाडे, हे डोंगर त्याने निर्माण केले. त्याची इच्छा! पण ही इच्छा अशी कशी? हे गरीब, हे महारोगी, ह्या हलक्या जाती, ह्या उच्च जाती ह्या त्याच्या इच्छेने झाल्या काय? मग हा देव असा कसा? आणि आहे कुठे तो? त्यापेक्षा आपणच आपले भले करून घ्यावे."

हा उपदेश करत गावेच्या गावे, शहरेच्या शहरे गाडगेबाबांनी पायांखाली घातली. बाबांचा एक नियम होता. तो त्यांनी अखेरपर्यंत पाळला. ज्या गावी, ज्या वस्तीत ते जात तेथे खराटे, फावडी, घमेली मागवत. मग सर्व गाव झाडून सारवून स्वच्छ होई. या गर्दीत कुणी पाया पडायला आला, की एक तडाखा देऊन बाबा म्हणत – "तुम्ही स्वतः तर काम करत नाही अन् दुसरा करतो तर असे आडवे येऊन पडता. व्हा बाजूला, बघा हे गाव कसं साजरंगोजरं – देवावाणी दिसतं आता!"

फैजपूरला काँग्रेसचे अधिवेशन झाले. पंडित नेहरू अध्यक्ष होते. लाखावरी लोकांची गर्दी झाली. त्या वेळी बाबांनी अधिवेशनाचे पटांगण झाडायचे काम आपल्या हाती घेतले. झाडलोट करून बाबा पसार होत. कुणाशी बोलणे नाही, की कुणाकडे जाणे नाही.

तुम्ही पंढरपूर पाहिले आहे का? नाशिक बघितले आहे? अन् देहू? आणि

आळंदी ? महाराष्ट्रातल्या अशा कुठल्याही तीर्थक्षेत्री किंवा शहरी तुम्ही गेलात तर तुम्हांला दिसेल, की बाबांनी स्वतः राबून, कष्टून, भीक मागून धर्मशाळा बांधल्या; काही नद्यांना घाट बांधले; पाणपोया उघडल्या; गरीब, अनाथ, अपंग यांच्यासाठी सदावर्ते सुरू केली. मुलांसाठी शाळा, कॉलेजे, वसतिगृहे उभी केली. दुःख दिसले की बाबा धावले. भूकंप झाला, दुष्काळ पडला, लोक अन्नान्न झाले की बाबा तिथे हजर! स्वतः राबायचे, लोकांनाही सेवेची प्रेरणा द्यायचे. त्यांतून अन्न, वस्त्र आणि अशाच गरजेच्या वस्तू निर्माण व्हायच्या. उजाड गावे उभी व्हायची. त्यांनी जात मानली नाही. त्यांचा देव म्हणजे अनाथ, अपंग, दरिद्री, दुःखी लोक. रंजल्यागांजलेल्यांची सेवा हीच बाबांची देवपूजा!

बाबा कसे दिसत ? डोक्यावर शुभ्र चांदीच्या रंगाचे केस, पिंगट डोळे, गोरा रंग. अंगात फाटका पण स्वच्छ सदरा, जाडजूड धिप्पाड देह. नेसायला एक लुंगी. एका पायात कापडाचा बूट, तर दुसरा पाय अनवाणी. हातात एक काठी, अन् एक गाडगे. हात सदा नमस्कारासाठी जोडलेले; पण दुसरा कोणी पाय धरू लागला की, ते पसार होत.

असेच एक दिवस ते या जगातून पळाले. गुप्त झाले. पुन्हा मात्र परत आले नाहीत. सगळे हाक मारत राहिले, "अहो बाबा, अहो महाराज, अहो गाडगे महाराज"....पण....!

पण बाबा परत आले नाहीत.

हा दुर्दैवी दिवस होता २० डिसेंबर १९५६!

— वामन चोरघडे

अभ्यास :

१. तरुणपणीच बाबांनी आपले घरदार का सोडले? २. त्यांची काम करण्याची पद्धत कशी होती? ३. बाबा ज्या समाजात होते त्या समाजातील लोकांचे वागणे त्यांना का आवडत नसे? ४. कीर्तनातून ते कोणता उपदेश करत असत? ५. कीर्तन झाल्यावर आरतीपूर्वीच बाबा पसार का होत असत? त्याचा कोणता परिणाम लोकांच्या मनावर होत असे? ६. आयुष्यभर बाबांनी कोणते काम केले? त्यांची आठवण करून देणाऱ्या कोणकोणत्या गोष्टी मागे राहिल्या आहेत?



# ३०. अभयारण्य

आपल्या देशात पूर्वी अनेक घनदाट अरण्ये होती. त्या अरण्यांत ऋषीमुनींचे आश्रम असत. ऋषीमुनी प्राण्यांवर प्रेम करीत. त्या अरण्यांत वन्य प्राणीदेखील मोकळेपणाने हिंडत. त्यांची कोणी शिकार करीत नसे. ऋषीमुनींचे त्यांना संरक्षण असे. हा सारा परिसर म्हणजे प्राण्यांच्या दृष्टीने अभयारण्यच होते.

ऋषीमुनींचा काळ आता राहिला नाही. पण आजही अभयारण्ये आपल्या देशात जागोजागी आहेत. वन्य पशुपक्ष्यांसाठी ती मुद्दाम राखून ठेवली आहेत. अरण्यातील पशुपक्षी हे आपल्या देशाचे सजीव धनच होय. अभयारण्ये या धनाचा सांभाळ करतात.

वन्य पशुपक्ष्यांबद्दल आपल्या मनात नेहमीच कुतूहल असते. एरवी हे प्राणी आपल्याला पाहायला मिळत नाहीत. म्हणूनच गावात एखादा दरवेशी अस्वल घेऊन आला की मुलामाणसांची त्याच्याभोवती कोण गर्दी उडते! माकड-वाल्याभोवती तर मुलांचे कोंडाळेच पडतं. गावात सर्कस आली म्हणजे ती

पाहण्यासाठी मुले किती उत्सुक असतात! पशुसंग्रहालयात तर यासाठी त्यांची सारखी गर्दी असते. पण खरे सांगायचे तर ते काय पाहणे झाले? वन्य पशूंना पाहायची खरी मौज येते ते रानावनात मोकळेपणी वावरत असतात तेव्हा. याचसाठी अभयारण्याची योजना केली आहे.

असेच एक अभयारण्य आपल्या महाराष्ट्रातील चांदा जिल्ह्यात आहे. 'ताडोबा राष्ट्रीय उद्यान' या नावाने ते ओळखले जाते. घनदाट वृक्षराजींनी ते गजबजलेले आहे. फळाफुलांनी बहरलेले आहे. त्यातील वन्य प्राणी हे तर त्याचे खास आकर्षण! असे हे ताडोबाचे उद्यान आपल्या राष्ट्राचे बहुमोल धन आहे.

चंद्रपूर नगरीपासून ताडोबा उद्यान अवघे पंचेचाळीस किलोमीटर दूर आहे. आरामगाडीने प्रवास करताना निसर्गाची शोभा पाहात पाहात ताडोबा तलावाजवळ आपण केव्हा येऊन पोहोचतो तेच कळत नाही. पक्ष्यांचा किलबिलाट व वाटेत वन्य श्वापदांचे होणारे दर्शन यांमुळे चित्त हरपते. ताडोबा राष्ट्रीय उद्यान हे नाव या तलावामुळेच पडले आहे. तलावाचा विस्तीर्ण निळा जलाशय, त्यात फुललेली कमळे, मंद गतीने चालणारी पांढरीशुभ्र बदके, भोवतालची हिरवीगार वनसंपदा अन् डोक्यावर आकाशाचा विशाल मंडप! हे सारे पाहून मन मोहून जाते. नजर खिळून राहते. डोळ्यांचे पारणे फिटते. चुकून एखाद्या वेळी नजर त्या दृश्यावरून निसटलीच तर....

तर समोर ताडोबा उद्यानाचे एक आगळेच भव्य रूप दृष्टीसमोर उभे ठाकते. जिकडे पाहावे तिकडे हळदू, कळंब, तेंडू, साग, शिसम, धावडा, सालई, बांबू यांची झाडेच झाडे दाटीदाटीने उभी असलेली दिसतात. हिरडा, टेंभुर्णी, खैर, पळस, अंजन यांची दूरवर पसरलेली वनेच्या वने आपले लक्ष वेधून घेतात. छोट्यामोठ्या टेकड्यादेखील हिरव्यागार गवताने आच्छादलेल्या असतात. चहूकडे कसे सारे हिरवेगार दिसते!

येथील वन्य पशुपक्ष्यांच्या दर्शनाने डोळे तृप्त होतात. सुसाट धावत सुटणारे सुंदर शिंगांचे काळवीट, चपळ हरणांचे कळप, डौलदार शिंगांची सांबरे पाहून

मन हरखून जाते. झाडांच्या फांद्यांप्रमाणे शिंगे असलेले चितळ आपले लक्ष वेधून घेतात. आखूडशिंगी, निळसर, राखी रंगाची नीलगाय हे तर ताडोबाचे भूषण! राठ केसांचे व लांब नख्यांचे अस्वल मंद गतीने डुलत डुलत तलावाकडे जाताना पाहून मोठी गंमत वाटते. आणि तो धिप्पाड गवा! त्याचा दिमाख काय सांगावा!

मधूनच रंगीबेरंगी, चित्रविचित्र पक्ष्यांचा थवा किलबिलाट करीत आपल्या डोक्यावरून भुर्रकन् उडत जातो. ताडोबा उद्यानातील विविध पक्ष्यांची तर गणतीच करता येत नाही. त्यांच्या मंजूळ किलबिलाटाने मन आनंदून जाते. मोर आपला सुंदर पिसारा उभारून थुईथुई नाचताना आढळतो. 'टिटिव-टिटिव' करणारी टिटवी सुरकन आपल्या डोक्यावरून सूर मारल्यासारखी निघून जाते. कबूतर, राघू, मैना, साळुंकी, कोकिळा, चिमण्या यांच्या गोड किलबिलाटाने मनाला आल्हाद होतो. झोकदार चालीने निरनिराळ्या रंगांचे, शोभिवंत तुऱ्यांचे, अणकुचीदार चोचींचे, चमकदार मण्यांप्रमाणे भासणाऱ्या डोळ्यांचे असंख्य पक्षी आपल्या मनाला भुरळ पाडतात.

ताडोबा तलावाभोवती ठिकठिकाणी उंच वृक्षांवर मचाणे बांधली आहेत. पाणी प्यायला येणाऱ्या हिंस्त्र श्वापदांचे दर्शन या मचाणांवरून घेता येते. कधी आपल्या डरकाळीने सारे जंगल दणाणून सोडणारा ढाण्या वाघ आपल्या दृष्टीस पडतो, तर कधी ठिपक्याठिपक्यांचा बिबळ्या आपल्याला दर्शन देतो. एखादा चपळ व चाणाक्ष चित्ताही नजरेला पडतो. सोनेरी डोळ्यांचा, शेपटीचा गोंडा उडवत जाणारा कोल्हा पाहून गंमत वाटते. पिंगट तपकिरी रंगाचा लांडगा अचानक आपल्यासमोर उभा ठाकतो.



अभयारण्याची ही अपूर्व शोभा पाहून मन तृप्त होते. तेथून पाय निघत नाही. अखेरीस मोटारीचे कर्णे जोरजोराने वाजू लागतात आणि नाइलाजाने परतावे लागते. पण मन मात्र तिथेच रेंगाळत राहते.

—पद्माकर सावरकर

**अभ्यास :**

१. ताडोबाचे उद्यान हे नाव कसे पडले? २. या उद्यानाला 'अभयारण्य' असे का म्हणतात? ३. या उद्यानात कोणकोणते पशुपक्षी पाहायला मिळतात? ४. काळवीट, हरीण, नीलगाय यांचे वर्णन करणारे शब्द शोधा. ५. पुढील शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा : डोळ्यांचे पारणे फिटणे, नजर खिळून राहणे, उभे ठाकणे.

**व्याकरण :**

१. खालील वाक्यांत आलेली नामे व त्यांची लिंगे ओळखा :

(अ) दरवेशी अस्वलाला नाचवतो. (आ) छोट्यामोठ्या टेकड्यादेखील गवताने आच्छादलेल्या असतात. (इ) मोर आपला पिसारा उभारून थुईथुई नाचतो.

२. पुढील नामांची स्त्रीलिंगी रूपे लिहा : वाघ, कोल्हा, मामा, काका, गवळी.

३. पुढील नामांची पुल्लिंगी रूपे द्या : आजी, मुलगी, नात, बहीण, आई.

# ३१. गर्वाचे घर खाली



कासवपुरीत त्या दिवशी सर्वत्र आनंदीआनंद दिसत होता. लहानमोठी सारी कासवे अगदी बेहोप झाली होती. त्या साऱ्यांच्या आनंदाचे कारण पण तसेच होते. साऱ्या कासव जातीची छाती अभिमानाने फुगावी अशी एक गोष्ट एका कासवाने केली होती. पळण्याच्या शर्यतीत एका सशाचा त्याने पूर्ण पराभव केला होता. विजेच्या चपळाईने पळणाऱ्या सशाला त्याने जिंकले होते. त्याच्या अभिनंदनासाठी सर्व जण एकत्र जमले होते.

यशस्वी कासवाच्या गळ्यात कितीतरी हार पडले त्याच्यावर अभिनंदनपर भाषणांचा जणू काही पाऊस पडला ! "वाहवा ! शाबास ! आमचे नाव राखले ! आपल्या जातीचा व कुळाचा उद्धार केला !" असे उद्गार सर्वत्र ऐकू येऊ लागले. त्या विजयी कासवाला तर स्वर्ग दोन बोटे उरल्याप्रमाणे झाले.

कासवांची मिरवणूक निघाली! आनंदाच्या आरोळ्यांनी व जयघोषांनी सारे आकाश दुमदुमून गेले! त्या आवाजाचे प्रतिध्वनी जवळच असलेल्या जंगलातील सशांच्या गावापर्यंत पोहोचले!

'सशांचा धिक्कार असो! कासवांचा जयजयकार असो!' या घोषणा सशांच्या कानांवर आता स्पष्टपणे येऊ लागल्या. त्याचा अर्थच त्यांना समजेना. 'आमचा कोण धिक्कार करतो आहे?' हा प्रश्न जो तो विचारू लागला. सशांच्या राजेसाहेबांच्या कानांवर ही बातमी गेली. त्यांनी झाडून साऱ्यांना एके ठिकाणी पाचारण केले. स्वतःच्या धिक्काराची बातमी ऐकून त्या सर्व सशांमध्ये एकच खळबळ माजून राहिली.

अशा वेळी एक ससा मात्र केविलवाणा चेहरा करून एका कोपऱ्यात उभा होता. त्याचा चेहरा अगदी उदास दिसत होता. त्याच्या डोळ्यांतून टपटप अश्रू गळत होते. आपले अश्रू त्याने पुसले आणि गर्दीतून वाट काढत तो थेट राजेसाहेबांच्या जवळ येऊन पोहोचला. त्याने राजेसाहेबांच्या पायांवर लोळण घेतली व तो म्हणाला, "महाराज, मला क्षमा करा. या साऱ्या प्रकारास मीच कारणीभूत आहे. मीच चांडाळाने हा अपमान सहन करण्याचा प्रसंग आपणांवर आणला आहे. माझ्या आळशीपणामुळे त्या दिवशी एका कासवाने माझा पराभव केला. त्याच्याशी झालेल्या पळण्याच्या शर्यतीत मी हरलो. याच माझ्या डोळ्यांवर त्या दिवशी झोप आल्यामुळे मी वाटेत झोपून राहिलो. ते हे दुष्ट



डोळे तुम्ही अत्ताच्या अत्ता फोडून टाका. महाराज, मी आनंदाने ही शिक्षा भोगण्यास तयार आहे."

सारा प्रकार राजेसाहेबांच्या लक्षात येण्यास उशीर लागला नाही. सर्व सशांनाही झाल्या गोष्टीचा उमज पडला.

राजेसाहेबांनी त्या अपराधी सशाला धीर दिला. त्याच्या पाठीवरून प्रेमाने हात फिरविला. ते म्हणाले, "बेटा, भिऊ नकोस! त्या कासवांच्या मूर्खपणाचे प्रायश्चित्त त्यांना लवकरच मिळेल."

कासवपुरीतील कासवांच्या आनंदाचे कारण सशांना कळताच ते सर्व खो खो हसतच सुटले.

सशांची सभा संपली! सध्या काहीही न करता स्तब्ध बसून राहावे असे त्यांनी ठरवले.

कासवांचा अभिमान ताडासारखा वाढत चालला. सशांची गाठ पडताच ते त्यांची हेटाळणी करू लागले! परस्परांतील हे वैर सारखे वाढतच चालले. एकमेकांना ते जणू पाण्यात पाहू लागले. अखेरीस या बाबतीत काय तो सोक्षमोक्ष करावा म्हणून सशांच्या राजेसाहेबांनी कासवांच्या राजेसाहेबांची मुलाखत घेतली. "उगीच आपल्यातील वैर वाढवू नका." असे त्यांनी त्यांना विनवले. पण कासवांच्या राजाचा ताठा व अभिमान कमी होण्याचे चिन्ह दिसेना.

"पुन्हा एकदा होऊ द्या शर्यत आणि पाहा काय घडते ते?" कासवांचे राजे गर्वात म्हणाले.

सशांचे राजे म्हणाले, "ठीक आहे. पण पश्चात्ताप करण्याची पाळी येईल हो शेवटी तुमच्यावर!"

"आमच्या कासवाला आली तशीच ना!" खोचकपणे कासवांचे राजे उद्गारले.

सशांचे राजे पुन्हा एकदा स्वतःशी हसले.

सशांची व कासवांची पळण्याची शर्यत पुन्हा एकदा व्हावी असे ठरले.

त्यानंतर पंधरा दिवस कोण गडबड व धांदल उडाली होती कासवपुरीत!

धावण्याच्या शर्यतीत भाग घेण्याकरता बारा कासवांची निवड केली होती. दमछाट होईपर्यंत पळण्याचा ते रोज सराव करत होते. सारी कासवे त्यांना उत्तेजन देण्यास मोठ्या हिरिरीने भाग घेत होती. "पाहा, आपले नाव राखणं तुमच्या हाती आहे." असे ती त्यांना बजावून सांगत होती.

सशांच्या गावात गडबड उडण्याचे काहीच कारण नव्हते. कासवांच्या मूर्खपणाला सारे जण हसत होते. त्यांनीही बारा जणांची निवड करून ठेवली होतीच. त्यांना पळण्याची सवय करण्याचे काहीच कारण नव्हते. आणि त्यांना कोणी उत्तेजन देण्याचीदेखील जरूरी नव्हती. तरी पण काही म्हातारे ससे त्यांना मधून मधून बजावतच, "सांभाळा बरं का रे पोरांनो! नाहीतर बसाल टंगळ-मंगळ करीत शर्यतीच्या वेळातच! आधी आपल्या जागी पोहोचा आणि मग करा इतर काय करायचे ते!"

झाले! एकदाचा शर्यतीचा दिवस उगवला! कासवपुरी व सशांचा गाव यांच्यामध्ये असलेल्या पटांगणात कासवांची व सशांची ही गर्दी झाली होती! मुंगीलादेखील शिरायला वाव मिळेना. बारा जणांची जोडीजोडीने शर्यत होणार होती. प्रत्येक कासवाला आपणच जिंकू असा अभिमान वाटत होता. त्यांचा तो मूर्खपणा पाहून ससे डोळे मिचकावत एकमेकांकडे पाहून मिष्किलपणे हसत होते.

'धाइ! धाइ!! धाइ!!! शर्यत सुरू झाली! पळा! पळा!!' एकच ध्वनी सर्व आकाशात दुमदुमू लागला. 'अरे ते गेले! गेले! पळा!' एकच हलकल्लोळ उडाला. सारी कासवे डोळ्यांत सारा जीव आणून शर्यतीकडे पाहू लागली. ओरडून ओरडून त्यांचे घसे कोरडे पडले. पळणाऱ्यांपेक्षा उत्तेजन देणाऱ्यांचीच खरी धांदल उडाली! पळणाऱ्यांची त्रेधातिरपीट तर विचारायलाच नको! सशांच्या समुदायात आनंद व हास्य यांचे फवारे उडू लागले! 'अरे पळा! पळा! कासवांच्या पुढे पळा!' असे ते ओरडू लागले. 'कासव शर्यतीत जिंकणार बुवा अं!' असे म्हणून ते कासवांना हिणवू लागले. इतक्यात शर्यतीत भाग घेणारे सारे ससे ठराविक ठिकाणी पोचून परत आलेदेखील.

त्यांना पाहताच साऱ्या कासवांचे डोळे पांढरे झाले. त्यांच्या राजेसाहेबांचा चेहरा तर काळाठिक्कर पडला. कासवे हरली !

'कासवांचा जयजयकार असो ! सशांचा धिक्कार असो !' खवचटपणे सारे ससे आरोळ्या मारू लागले. "जाऊ द्या. मेलेल्यांना काय मारता ?" एक शहाणा ससा मोठ्याने म्हणाला आणि सर्व कासवे लाजेमुळे आपापले पाय व मान पोटात घेऊन बसून राहिली.

त्यांना पाहताच ससे म्हणतात—

"कासवकाका, कासवकाका, पळण्याची शर्यत लावता काय ?
नको रे बाबा, शर्यत तुमची, आमचे आपले पोटात पाय !"

—रा. ना. झोळ

**अभ्यास :**

१. कासवपुरीत सर्वत्र आनंदीआनंद का झाला होता ?
२. आपसांतील वैर मिटवावे म्हणून सशांच्या राजाने काय केले ?
३. शर्यतीच्या तयारीसाठी कासवांनी कोणकोणते प्रयत्न केले ?
४. शर्यतीच्या देखाव्याचे वर्णन करा.

**व्याकरण :**

खालील वाक्ये वाचा :

(अ) ते कासव आनंदाने बेहोष झाले होते. (आ) कासवे हरली.
(इ) एक ससा केविलवाणा चेहरा करून उभा होता.
(ई) सर्व ससे खो खो हसतच सुटले.

एकच ससा उभा होता. सर्व ससे म्हणजे एकापेक्षा अधिक ससे हसू लागले. कासव, कासवे, ससा, ससे ही नामे आहेत. कासव, ससा ही एकवचनी नामे आहेत. कासवे, ससे ही अनेकवचनी नामे आहेत.

१. (अ) पुढील नामांची अनेकवचने सांगा : शर्यत, माळ, आरोळी, डोळा, चेहरा.
(आ) पुढील नामांची एकवचने सांगा : भाषणे, गोटे, बातम्या, नद्या, घरे.



# ३२. रानात एकटेच पडलेले फूल

वन सर्व सुगंधित झाले । मन माझे मोहुन गेले – किति तरी !
मी सारे वन हुडकीले । फुल कोठे नकळे फुलले – मज तरी,
स्वर्गात । दिव्य वृक्षास । बहर ये खास ।
असे कल्पीले – असे कल्पीले । मन माझे मोहुन गेले – किति तरी !

परि फिरता फिरता दिसले । फुल दगडाआड लपाले – लहानसे
दिसण्यात । फार ते साधे, । परी आमोदे
जगामधि पहिले – जगामधि पहिले । मन माझे मोहुन गेले – किति तरी !
मी प्रेमे वदलो त्याशी । 'का येथे दडुनी बसशी – प्रिय फुला ?
तू गडे । फुलांची राणी, । तुला गे कोणी ।
रानि धाडीले – रानि धाडीले ?' मन माझे मोहुन गेले – किति तरी !

ते लाजत लाजत सुमन । मज म्हणे थोडके हसुन
'निवडिले । प्रभूने स्थान । रम्य उद्यान ।
तेच मज झाले, – तेच मज झाले.' । मन माझे मोहुन गेले–किति तरी !

— ना. वा. टिळक

**अभ्यास :**

१. फूल साधे असूनही कवीला का आवडले? २. फूल लाजून काय म्हणाले ? का? ३. 'जगामधि', 'दगडाआड' या शब्दांतील मधि, आड या शब्दांची योजना लक्षात घ्या. यांसारखे इतर कोणते शब्द जोडले जातात हे उदाहरणे देऊन सांगा. ४. फिरता फिरता, लाजत लाजत यांसारखे इतर काही शब्द आपल्या पुस्तकातून शोधून काढा.



## ३३. अशी आहे मुंबई

माधव रामराव सेवेकरी,
द्वारा–श्री. वि. बा. सरवटे,
'ईशकृपा' शिवाजी पार्क, मुंबई २८.
दिनांक : २–१०–१९६९.

प्रिय ताई,

मुंबईस सुखरूप येऊन पोचल्याचे पत्र मी पाठवले होते ते मिळाले असेलच.

गेल्या चारपाच दिवसांत मामांच्या बरोबर हिंडून मुंबई पाहात आहे. मुंबई कितीही पाहिली तरी ती पाहून झाली असे वाटत नाही. बोरीबंदर स्टेशन पाहून तर मी थक्कच झालो. एका शेजारी एक अशा दहाबारा गाड्या या स्टेशनामध्ये थांबू शकतात. बोरीबंदर स्टेशनवर उतरल्यानंतर घोडागाडीने मामांच्या घरी गेलो. मुंबईची घोडागाडी सुरेख असते. चार चाकांच्या रथात बसल्यासारखे वाटते. घोडे मात्र थकलेले होते. त्यामुळे ही घोडागाडी डुलत डुलत चालली होती. हिला व्हिक्टोरिया असे नाव आहे. मामा म्हणाले, 'फार पूर्वी मुंबईत ही व्हिक्टोरिया गाडी प्रिय होती. लोक याच गाडीतून फिरत असत. पण आता

आगगाडी, बस आणि मोटारी यांनी या घोडागाडीला मागे टाकले आहे.

इथली दोनमजली बसगाडी पाहून मौज वाटली. वळण घेताना बसगाडी उलटेल की काय अशी भीती वाटत होती. पण मामांबरोबर बसच्या दुसऱ्या मजल्यावर बसून प्रवास केला. गंमत वाटली. बससाठी लोक रस्त्याच्या कडेला रांगा करून उभे राहतात. बस थांबली की आत चढतात. प्रत्येक फलाटावरून दर तीनचार मिनिटांनी धावणाऱ्या आगगाड्याही आहेत. लोक उतरतात, झुंडीने चढतात. इथली गर्दी आणि धावपळ पाहिली की चुकायला होईल या भीतीने जीव गांगरून जातो; म्हणून मामांचा हात धरून फिरतो. पण मामासुद्धा धावतच असतात. इथले लोक शांतपणे चालताना दिसत नाहीत. ते नेहमी घाईतच असतात. त्यांची सारखी धावपळच असते. मामा म्हणतात, नोकरीधंद्याच्या निमित्ताने त्यांना तसे करावे लागते. नोकरीधंद्यासाठी भारताच्या कानाकोपऱ्यातून निरनिराळ्या भाषा बोलणारे तसेच अनेक धर्मांचे लोक येथे आले आहेत.

रस्त्याच्या दुतर्फा उंच उंच इमारती आहेत. काही ठिकाणी तर वीस वीस मजली इमारती दिसतात. त्याहीपेक्षा उंच इमारती बांधण्याचे काम चालूच आहे. रस्त्यावर उभे राहून मजले मोजतासुद्धा येत नाहीत. काल एका उंच इमारतीचे मजले मोजता मोजता माझी टोपी मागल्या मागे खाली पडली.

दोन दिवसांपूर्वी सचिवालय पाहिले. ती टोलेजंग इमारत आहे. तिथे आपल्या मंत्र्यांच्या कचेऱ्या असतात. महाराष्ट्र सरकारचे हे मुख्य कार्यालय. तेथूनच जवळ मुंबई विद्यापीठ आहे. विद्यापीठाच्या आवारात अती उंच असा राजाबाई टॉवर आहे. तो पाहून आम्ही भारताचे प्रवेशद्वार पाहायला गेलो. तेथे जवळच असलेला शिवाजीमहाराजांचा अश्वारूढ पुतळा पाहिला. हे प्रवेशद्वार समुद्रकाठीच बांधलेले आहे. दूरवर पसरलेला समुद्र पाहून आनंद झाला. जवळच गोदीतील मोठमोठी जहाजे, नावा व क्रेन दिसत होते. तेथला वारा कसा छान होता.

काल आरे येथील गवळीवाडा पाहिला. येथे हजारो म्हशी आहेत. येथे दुधाच्या बाटल्या हळूहळू यंत्रानेच पुढे सरकतात. दूध गरम करून थंड करण्याची मोठी

यंत्रेही मी पाहिली. यंत्रानेच दुधाच्या बाटल्या धुतल्या जात होत्या व त्यांत दूध भरले जात होते. या बाटल्या रोज सकाळी आणि संध्याकाळी मुंबईकरांना मिळतात.

वीरमाता जिजाबाई भोसले उद्यानसुद्धा पाहिले. याच उद्यानाला पूर्वी 'राणीचा बाग' म्हणत असत. येथे वाघ, सिंह यांसारखी हिंस्त्र जनावरे आहेत. गेंडा, पाणघोडा, शहामृग, तरस, अस्वल अशी कितीतरी मी पूर्वी न पाहिलेली जनावरे या बागेत मला पाहायला मिळाली.

आज सकाळीच मलबारहिलवर गेलो होतो. ही एक छोटीशी टेकडी आहे. येथील नेहरू उद्यान पाहण्यासारखे आहे. येथून मुंबईवर नजर फिरवता येते. बागेतील म्हातारीचा बूट' पाहून मोठी मजा वाटली. बुटाच्या आकाराची ही छोटीशी इमारत. या इमारतीत अगदी वर जाता येते. परत येताना चौपाटीवरील लोकमान्य टिळकांचा पुतळा पाहिला. तेथून जवळच असलेले मत्स्यालयही पाहिले.

येथून थोड्याच अंतरावर बाणगंगा आणि वाळकेश्वर ही ठिकाणे आहेत. या दोन ठिकाणांस ही नावे कशी पडली याची गमतीदार हकीगत मामांनी सांगितली. प्रभू रामचंद्र वनवासात असताना सीतेचा शोध करत येथे आले. तेव्हा येथील ब्राम्हणांनी त्यांना सांगितले, की तुम्ही शंकराची पिंडी करून तिची पूजा करा, म्हणजे सीता परत मिळेल. मग प्रभू रामचंद्रांनी वाळूची पिंडी तयार केली. तिलाच वालुकेश्वर नाव पडले. पण पूजेला पाणी मिळेना; तेव्हा लक्ष्मणाने बाण मारून गंगा उत्पन्न केली आणि पूजेला पाणी आणले. म्हणून 'बाणगंगा' असे नाव पडले. आता तेथे पाण्याचा एक तलाव आहे आणि वालुकेश्वराचे देऊळ आहे. जेथे प्रभू रामचंद्रांना पूजेसाठी पाणी मिळाले नाही, तेथे आम्हांला काय मिळणार असे म्हणून मामा हसले. परंतु मुंबईस पाणी मिळावे म्हणून मुंबईपासून काही अंतरावर नगरपालिकेने पाण्याचे चार मोठे तलाव बांधले आहेत, असे मामा म्हणाले. तेथून नळाने पाणी मुंबईत येते.

मुंबई शहरात आम्हांला कारखानेच कारखाने दिसले. एवढेच काय शहरात-देखील जिकडे तिकडे लहानमोठे कारखाने आहेत. कापडगिरण्या, मोटारी, सायकलींचे कारखाने, विजेची आणि इतर यंत्रे करण्याचे कारखाने, एक ना दोन!

येथे अनेक वस्तू तयार होतात. मला तर मुंबई हे कारखान्यांचे शहर वाटले.

मुंबईबद्दल किती लिहू आणि किती नको असे वाटते! पण आता हे पत्र आवरते घेतो. कारण नळ आला आहे. दोन बादल्या भरून पाणी आणतो. तेवढीच मामीला मदत केल्यासारखे होईल. नाहीतर ती म्हणेल, हा भाचा नुसता जेवतो आणि भटकतो.

आणखी दोन दिवसांनी मी परत यायला निघणार.

आईबाबांना नमस्कार सांग.

तुझा,
माधव

—जयवंत दळवी

**अभ्यास :**

१. मुंबई शहरात उंच उंच इमारती बांधण्याची गरज का भासली? २. मुंबईचे लोक नेहमी घाईतच असतात याचे कारण काय? ३. माधवला आरे गवळीवाड्यात कोण-कोणत्या विशेष गोष्टी दिसल्या? ४. परगावी राहणाऱ्या तुमच्या एखादया मित्राला दहा-बारा ओळींचे पत्र लिहा. त्यात तुमच्या गावासंबंधी थोडक्यात माहिती दया.

**व्याकरण :**

१. कंसात दिलेल्या नामांची योग्य रूपे रिकाम्या जागी लिहा :

(अ) तेथील ........ सुरेख आहेत. (घोडागाडी)

(आ) रस्त्याच्या दुतर्फा उंच उंच ............ आहेत. (इमारत)

(इ) दूध गरम करून थंड करण्याची मोठमोठी ............ मी पाहिली. (यंत्र)

(ई) दोन ............ भरून पाणी आणतो. (बादली)

२. या पाठातील 'आज सकाळीच ........ मत्स्यालयही पाहिले.' हा परिच्छेद वाचा. यातील नामे ओळखा आणि त्यांची लिंगे व वचने कोणती ते वहीत लिहा.

# ३४. वेरूळची लेणी

डोंगराची चढण तशी फारशी नाही. आता तर मोटारी थेटपर्यंत जातात. या टेकड्या पुष्कळ दूरवरून दिसतात. शिखरावरचा शंभू आणि जेजुरीचा खंडेराय कितीतरी लांबूनच दिसू लागतात. इथे तसे नाही. अगदी वर जाऊन पोहोचेपर्यंत काय पाहायचे आहे त्याची कल्पनाच येत नाही. तेही बरे आहे. जे दिसणार आहे ते नेहमीपेक्षा इतके निराळे, अद्‌भुत आहे की ते एकदम डोळ्यांसमोर यावयास हवे. आपण पुष्कळदा देवळात जातो. वेरूळची ही लेणीसुद्‌धा मंदिरेच आहेत. पण नेहमीपेक्षा खूपच निराळी, त्यांना लेणी म्हणतात. ही मंदिरे डोंगरांच्या कुशीतच खोदलेली आहेत. डोंगरातच मोठमोठे मंडप, ओसऱ्या, खोल्या खोदून काढल्या आहेत. आपल्या महाराष्ट्रात अजिंठा, जुन्नर, नाशिक, कार्ले अशा कितीतरी ठिकाणी अशी लेणी आहेत. मग वेरूळची लेणी कुणी कोरली आणि केव्हा ?

अगदी सुरुवातीला गौतम बुद्‌धाचे भक्त असलेले बौद्‌ध लोक होते. त्यांच्यानंतर शिव व विष्णू यांची पूजा करणारे हिंदू, शेवटी भगवान महावीराचे अनुयायी असणारे जैन आले. या तिघांनी आपापल्या सोयीप्रमाणे, चालीरीतीप्रमाणे हे आश्रम व ती मंदिरे खोदली. त्याला आता दीड हजार वर्षे झाली.

पहिलेच जे लेणे आहे ते बुद्‌धाचे मंदिर. समोरच्या ओसरीतून आत गेलो की मोठा थोरला मंडप. त्याच्या डाव्या उजव्या हातांना ओवऱ्या तयार करून त्यांच्या भिंतींत मोठाले कोनाडे केले आहेत. त्यांत निरनिराळ्या बौद्‌ध देवदेवतांच्या मूर्ती बसवल्या आहेत. गाभाऱ्याकडे जाऊ लागले की दरवाजासमोरचे प्रचंड पहारेकरी लक्ष वेधून घेतात. चौदा फूट उंचीचे हे दगडी पहारेकरी आकाराने राक्षसी असले तरी त्यांचे चेहरे मात्र प्रेमळ आहेत. आतली बुद्‌धमूर्ती अशीच. आकार अवाढव्य पण मुद्रा शांत, समाधानी आहे. बुद्‌धदेवाचे दर्शन घेऊन बाहेर यावयास निघालें, की मंडपातल्या जाडजूड भक्कम खांबाकडे लक्ष जाते.

आत आलो तेव्हा ते इथे होतेच. पण लक्ष होते मूर्तीकडे. आता या खांबाचा डौल डोळ्यांत भरतो. एका बाजूने उजेड आत येतो. पण गुंफा अंधारीच आहे. अगदी स्वस्थ उभे राहिलेले हे आखीव खांब, गुहेतला अंधार व गारवा, मूर्तीच्या चेहऱ्यावरचे समाधान, शांतता या सगळ्यांमुळे मनाला कसे शांत वाटते. इथून बाहेर जाऊच नये असे वाटते.

याला लागून जी आणखी आठदहा बौद्ध लेणी आहेत, त्यांत दोन गुंफा तीनमजलीही आहेत. त्यांच्यानंतर, रावण-की-खाई, दशावतार, कैलास, रामेश्वर, घुमार लेणे अशा हिंदू गुंफा आहेत. कैलास आणि घुमार लेणी सोडली तर बाकीच्यांची रचना बौद्ध मंदिरांसारखीच आहे. फक्त आतल्या मूर्ती बुद्धा-ऐवजी शंकर, विष्णू यांच्या; आणि या मूर्ती हेच वेरूळचे खरे वैभव! बौद्ध लेण्यांत प्रचंड मूर्ती कोरलेल्या आहेत. त्यांची अंगकाठी डौलदार आहे पण त्यांचे चेहरे मात्र एकाच छापाचे आहेत.

आतल्या मूर्ती अवाढव्य आणि घाटदार आहेत. एकाच छापाच्या नाहीत. त्यांच्या तोंडावर निरनिराळे भाव दिसतात. नरसिंहाचीच मूर्ती घ्या. हिरण्य-कश्यपूच्या अंगावर झेप घेण्याचा आवेश त्याच्या हालचालीत आहे. मुद्राही इतकी रागीट की पाहून खरोखरच भीती वाटावी. सबंध मूर्तीत इतका जिवंत-पणा आहे. दुसरी एक मूर्ती दिसते ती शंकरपार्वतीची. ती दोघे कैलास-पर्वतावर बसली असून रावण तो आपल्या वीस बाहूंचा जोर लावून उचलत आहे. मूर्ती दगडी असून एखादा प्रचंड पुरुष आपले सर्व बळ एकवटून हा डोंगर उचलत आहे असे वाटते. सगळ्या हालचाली इतक्या स्वाभाविक आहेत की ती जणू जिवंत माणसेच वाटतात. इथल्या सगळ्याच लेण्यांत असे जिवंत शिल्पकाम दिसते. या मूर्तींच्या जोडीला मंदिरे सजवण्यासाठी कितीतरी प्रकारच्या वेलपत्त्या, फुले, पक्षी असे कोरीव काम केलेले आहे. याखेरीज अवाढव्य अशी हत्ती, सिंह यांचीही शिल्पे आहेत.

खरोखरी हे पाहू का ते असेच मनाला वाटू लागते. प्रत्येक गोष्ट तितकीच सफाईदार, सुंदर. शेवटी पाहायचे ते कैलास मंदिर. यात एकदोन मंडप किंवा



खोल्या एवढेच खोदलेले नाही. सबंध देऊळच कोरून काढले आहे. गाभारा, नृत्यमंडप, नंदी मंडप हे सगळे देवळाचे भाग इथे आहेत. या लेण्यांभोवताली अप्रतिम मूर्तिकाम आहे. त्यात रामायण व महाभारत यांचे देखावेही आहेत. ते पाहावेसे वाटतातच. पण पुन्हा पुन्हा लक्ष जाते ते मंदिराच्या वास्तूकडे. ही प्रचंड व सौष्ठवपूर्ण इमारत म्हणजे वेरूळ लेण्याचा मुकुटमणीच होय.

—म. श्री. माटे

अभ्यास :

१. तिसऱ्या इयत्तेत तुम्ही अजिंठ्याच्या लेण्यांचे वर्णन वाचले आहे. अजिंठ्याच्या लेण्यांत व वेरूळच्या लेण्यांत तुम्हांला कोणता फरक आढळतो ?

२. वेरूळप्रमाणे इतर कोणत्या ठिकाणी लेणी आहेत ?

३. वेरूळ लेण्यांचा 'मुकुटमणी' कोणता ? त्याचे दहा वाक्यांत वर्णन करा.

४. तुम्हांस एखाद्या लेण्याचे वर्णन करायचे आहे. त्यासाठी अत्यंत आवश्यक वाटणारे दहा शब्द लिहा. (उदा. कोरीवकाम, मूर्ती इ.)

५. खालील शब्दांच्या योग्य जोड्या जुळवा :

| | |
|---|---|
| मूर्ती | पहारेकरी |
| मूर्तिकाम | अप्रतिम |
| इमारत | अवाढव्य |
| आकार | सौष्ठवपूर्ण |
| | प्रचंड |

**व्याकरण :**

खालील वाक्ये वाचा :

(अ) बाबा रोज पहाटे शेतावर जातात.

(आ) पाहुणे कालच आपल्या गावी गेले.

(इ) मी त्यांच्याकडे दिवाळीत जाईन.

वरील वाक्यांत 'जातात', 'गेले', 'जाईन' ही क्रियापदे आली आहेत. पहिल्या वाक्यात जाण्याची क्रिया सध्या घडत असल्याचे समजते. दुसऱ्या वाक्यात जाण्याची क्रिया मागे केव्हातरी घडल्याचे कळते. तिसऱ्या वाक्यात जाण्याची क्रिया पुढे घडणार असल्याचे समजते. 'जातात' या क्रियापदाच्या रूपावरून क्रिया चालू काळात घडत असल्याचे कळते. याला वर्तमानकाळ म्हणतात. 'गेले' या रूपावरून क्रिया पूर्वी घडल्याचे समजते. याला भूतकाळ म्हणतात. 'जाईन' या रूपावरून क्रिया पुढे घडणार असल्याचे समजते. याला भविष्यकाळ म्हणतात.

१. खाली दिलेल्या वाक्यांतील क्रियापदांचे काळ ओळखा :

(अ) या तिघांनी आपापल्या सोयीप्रमाणे व चालीरीतीप्रमाणे हे आश्रम व ही मंदिरे खोदली.

(आ) एका बाजूने उजेड आत येतो.

(इ) मी तुम्हांला कैलास लेण्याचे एक चित्र अवश्य पाठवीन.

(ई) वेरूळ येथे सुंदर कोरीवकाम आढळते.



## ३५. माझा गाव

निळ्या खाडीच्या काठाला
माझा हिरवाच गाव
जगात मी मिरवितो
त्याचे लावुनिया नाव

पूल ओलांडिता पुढे
रस्ता येईल तांबडा
घरी आणील सरळ
जरी दिसला वाकडा

पहा तेथून खालती
साळ वाकते सोन्यात
बघालच जेवताना
कुंकू प्रत्येक दाण्यात

माणसाच्या जागीसाठी
दाटी करितात माड
गर्द मधेच एखादे
आंब्याफणसाचे झाड

असो झाडी किंवा वाडी
सुने नाही वाटायचे
नादी आपुल्याच कोणी
तेथे गात असायचे

थोड्या पायवाटा हिंडा
लाल तांबड्या वाकड्या
होड्या उपड्या झालेल्या
तशा बघाल टेकड्या

जेथे होईल माध्यान्ह
तेथे पान वाढलेले
काळोखात कुणीतरी
ज्योत घेऊन आलेले

श्रमी प्रेमळ जिवांची
पाच हजारांची वस्ती
खडा मारिताच परी
दिसे मोहळाची मस्ती

इथे जे जे काही भले
ते ते सगळ्या गावाचे !
भाग्यभूषण वाटते
एका दुर्गेच्या नावाचे !

उभ्या गावच्या जाईने
तिचे मढते मंदिर
नाही काही चांदण्यात
दुजे त्याहून सुंदर !

जाल जेव्हा चुकू नका
तिच्या पूजा-नैवेद्याला
नका राहू आल्यावीण
माझ्याकडे निवाऱ्याला

गोव्यातला माझा गाव
असा ओव्यांतच गावा
तेथे जाऊन राहून
डोळे भरून पाहावा !

—बा. भ. बोरकर



अभ्यास :

१. 'माणसाच्या जागीसाठी दाटी करितात माड !' ही कल्पना समजावून घ्या.
२. दाटी करणे, सुने वाटणे, डोळे भरून पाहणे या वाक्प्रचारांचा अर्थ सांगून त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
३. काळ दाखवणारे कोणकोणते शब्द या कवितेत आले आहेत ?
४. 'इथे जे जे काही भले ते ते सगळ्या गावाचे !' असे कवीने का म्हटले आहे ?
५. या कवितेतील गावाच्या सौंदर्याचे थोडक्यात वर्णन करा.

# ३६. उद्यमनगर



'ठणठण – घणघण' यंत्रे फिरत आहेत. कामगारांचे हात हालत आहेत. त्यांच्या कपाळावरून घाम गळत आहे. कष्टाचे समाधान त्यांच्या चेहऱ्यावर पसरले आहे. उद्यमनगरातील या कारखान्यांतून शेतीसाठी पाणी उपसणारी ऑइल-इंजिने तयार होत आहेत. कोल्हापुरातील हे उद्यमनगर. त्याच्या एका अंगाला कोटीतीर्थ तलाव आहे व दुसऱ्या बाजूला जयंती ओढा वाहतो आहे.



छोट्यामोठ्या कारखान्यांनी हे नगर कसे गजबजून गेले आहे. सबंध शहर जेव्हा रात्री काळोखाचे पांघरूण घेऊन झोपी जाते, त्या वेळी हे उद्यमनगर विजेच्या लख्ख प्रकाशात जागे असते. अविरत काम करण्यात गर्क झालेले असते. अहोरात्र कष्ट करून संपत्ती निर्माण करणाऱ्या या उद्यमनगरात आज अनेक छोट्यामोठ्या कारखान्यांच्या डौलदार इमारती दिमाखाने उभ्या आहेत. रेखीव रस्त्यातून छानदार मोटारी धावताना कुणालाही हेवा वाटावा असे वैभव या नगराला लाभले आहे. हे उद्यमनगर म्हणजेच कोल्हापुरात नव्याने उभारलेली औद्योगिक वसाहत होय.



पन्नास-पाऊणशे वर्षांपूर्वी या जागी केवळ एक उजाड माळ होता. फड्या निवडुंग व खुरटी झाडेझुडपे यांखेरीज त्या ठिकाणी दुसरे काहीही नव्हते. डुकरे व मोकाट जनावरे यांचाही तिथे वावर असे. दिवसादेखील कोणी माणूस तिकडे फिरकत नसे. पण आता त्याच जागी एक सुरेख औद्योगिक वसाहत उभी आहे.

हे सगळे घडले कसे ? आज जी औद्योगिक वसाहत कोल्हापुरात दिसते

ती काही एकाएकी निर्माण झाली नाही. परिस्थितीची थोडी अनुकूलता आणि माणसांची जिद्द यांतून तिचा जन्म झाला आहे. अशी कोणती अनुकूलता होती?

कोल्हापुरी गूळ फार प्रसिद्ध आहे. कोल्हापूरच्या जमिनीत उसाचे पीक चांगले येते. हे जेव्हा शेतकऱ्यांना कळले तेव्हा ऊसमळे केले जाऊ लागले. या उसाची लागवड मोठ्या प्रमाणात होऊ लागली आणि विहिरींवर मोटेऐवजी ऑइल-इंजिने बसवली जाऊ लागली. ही इंजिने काही कारणाने बंद पडली म्हणजे खेड्यातला शेतकरी दुरुस्तीसाठी कोल्हापूरच्या मेस्त्रीकडे धाव घेई. सर्व्हिस-मोटारीची जुजबी दुरुस्ती करणारा हा मेस्त्री इंजिने दुरुस्त करून शेतकऱ्यांची नड भागवू लागला.

मोटार-स्टँडभोवती असे दहा-पंधरा मेस्त्री होते. त्या काळी कोल्हापूर जिल्ह्यात उसाची जमीन पंधरावीस हजार एकरांच्या आसपास असावी. शेतकऱ्यांपाशी ऑइल–इंजिनेही थोडी होती. पण स्वातंत्र्यानंतर देशात विकासाची चाके फिरू लागली आणि जिल्ह्यात सामान्य शेतकऱ्यांच्या मालकीचे सहा साखर-कारखाने निघाले. त्यामुळे कोल्हापूर भागात आता एक लाख एकरांत उसाचे मळे फुलले. म्हणूनच शेतकऱ्यांची ऑइल-इंजिनांची मागणी हजारोंनी वाढली. यातून इंजिन दुरुस्त करणारा साधा कसबी मेस्त्री इंजिने तयार करणारा कारखानदार बनला. त्यातून हे उद्यमनगर निर्माण झाले. साध्या कामगार मेस्त्रींचे कारखानदार बनले. त्यांचे साडेतीनशे-चारशे कारखाने आज उद्यमनगरात डौलाने उभे आहेत.

उद्यमनगरात पाणी उपसणारी नुसती ऑईल-इंजिनेच नव्हे तर यंत्रमागाचे सुटे भाग, लोखंडी फर्निचर, भात सडायची यंत्रे, चुना बनवायची यंत्रे, छोटे लेथ, अग्निशामक, मोठ्या पाण्याच्या टाक्या, मिरची कुटायची यंत्रे, छापण्याची





यंत्रे बनू लागली आहेत.

कोल्हापूरच्या मातीत ऊसमळा फुलला. उसाला पाणी पाजण्यासाठी ऑईल-इंजिने आली. इंजिन दुरुस्त करणारा साधा कसबी कामगार इंजिने तयार करू लागला. आणि कामगारांतून मालक बनलेल्यांनी असे कारखाने वसवले. हेच कोल्हापूरचे गजबजलेले उद्यमनगर होय.

—जयसिंग शिंदे

अभ्यास :

१. उद्यमनगराच्या उभारणीसाठी कोणकोणत्या गोष्टी कारणीभूत झाल्या ?

२. उद्यमनगरात कोणकोणती यंत्रे तयार होतात ?

३. उद्यमनगराच्या वसाहतीचे थोडक्यात वर्णन करा.

४. तुमच्या जिल्ह्यात औद्योगिक वसाहती कोठे आहेत ? त्याबद्दलची अधिक माहिती मिळवा.

व्याकरण :

१. कंसातील क्रियापदांची योग्य रूपे रिकाम्या जागी भरा :

(अ) कोल्हापूर येथील कारखान्यात लवकरच ट्रॅक्टर तयार ........ (होणे)

(आ) शेतकऱ्यांच्या मालकीचे सहा साखर-कारखाने ........ (निघणे)

(इ) उसाला पाणी पाजण्यासाठी ऑईल-इंजिने ........ (येणे)

(ई) फड्या निवडुंग व झाडेझुडपे यांखेरीज त्या ठिकाणी काही ........ (नसणे)

२. योग्य जोड्या जुळवा :

| | |
|---|---|
| तुम्ही | उडाली |
| तू | बसवल्या |
| विमाने | बसा |
| मोटारी | बसली |
| मूर्ती | धावणार |
| | आलास |



# ३७. अती तिथं माती

(चक्रमादित्य महाराजांचा दरबार. महाराज प्रवेश करतात.)

**सेवक :** समशेरबहाद्दर, श्रीमंत चक्रमादित्य महाराजांचा जयजयकार असो ! (सर्व जण जयजयकार करतात.) आस्ते कदम महाराज....आस्ते कदम....

**महाराज :** (सिंहासनावर बसून) बसा मंडळी, बसा. (प्रधानास) काय प्रधानजी, कशी काय आहे राज्याची हालहवाल ?

**प्रधानजी :** (हात जोडून) आपल्या कृपेने उत्तम आहे. गोरगरीब भरपूर कष्ट करीत आहेत. श्रीमंत लोक सुखात आहेत.

**महाराज :** छान ! उत्कृष्ट ! बरं, चोरीमारी वगैरे ?

**प्रधानजी :** छे ! कोणी चोरी करीत नाहीत. फक्त चोर तेवढे चोऱ्या करीत आहेत.

**महाराज :** फारच छान. बरं, रोगराई वगैरे ?

**प्रधानजी :** बिलकूल नाही ! चारदोन साथीचे रोग आले; त्यांत शेपाचशे माणसं मेली. बाकी सगळे लोक जिवंत आहेत.

**महाराज** : वा वा ! प्रधानजी, आमच्या राज्याची हालहवाल एकूण उत्तम आहे म्हणायची ! बरं, आज करमणुकीचा कार्यक्रम ?

**प्रधानजी** : एक उत्तम गवईबुवा आलेले आहेत. त्यांचं गाणं ऐकावं सरकार.

**महाराज** : त्याचं नाव काय म्हणालात ?

**प्रधानजी** : गानसेन.

**महाराज** : काय ? घाणशेण ? छीः !....हे कसलं नाव ? आम्हांला नाही आवडलं.

**प्रधानजी** : घाणशेण नाही महाराज, गानसेन.

**महाराज** : बरं बरं बोलवा त्यांना.

(गवईबुवा येतात. नमस्कार करतात.)

**गवई** : महाराजांचा विजय असो !

**महाराज** : गवईबुवा, तुम्हांला काय येतं ? तबल्यावर पेटी वाजवून दाखवता ? नाहीतर असं करा. पेटीवर तबला वाजवा.

**गवई** : महाराज, मी वादक नाही. गवई आहे. संगीत गातो.

**महाराज** : बरं बरं, म्हणा काहीतरी.

(गवईबुवा मांडी घालून बसतात. हातवारे करून एक गाणे बेसूर आवाजात म्हणतात. महाराज खूष होतात.)

**महाराज** : वा, गवईबुवा, तुमचा आवाज साखरेसारखा गोड आहे. बोला, तुम्हांला काय बक्षीस पाहिजे, बोला.

**गवई** : महाराज मला स्वतःला काही एक नको. सध्या संगीताला वाईट दिवस आले आहेत. संगीत-कलेसाठी काहीतरी करा.

**महाराज** : अवश्य, अवश्य ! काय बरं करावं ? (विचार करतो. मग टाळी वाजवून) हां, छान कल्पना सुचली, प्रधानजी—

**प्रधानजी** : आज्ञा महाराज.

**महाराज** : संगीताला उत्तेजन दिलं पाहिजे. आत्ताच्या आत्ता दवंडी पिटवा. म्हणावं, आजपासून आमच्या राज्यात सगळ्यांनी गाण्यात बोलायचं. कुणीही साधं बोलायचं नाही. सगळं गात गातच बोललं पाहिजे.

**प्रधानजी** : ठीक आहे, सरकार.

**महाराज** : जो कुणी गाण्यात बोलणार नाही त्याला शिक्षा. पहिल्यांदा त्याला चढवा सुळावर. मग हत्तीच्या पायी देऊन नंतर त्याचा कडेलोट करा. आणि पुन्हा असं करणार नाही हे त्याच्याकडून मागाहून लिहून घ्या.

**प्रधानजी** : आत्ताच दवंडी द्यायची व्यवस्था करतो.

(हळूहळू रंगमंचावर अंधार होतो. त्या अंधारातच प्रथम दवंडीचा आवाज व नंतर दवंडीवाल्याचे गाण्यात ओरडणे ऐकू येऊ लागते.)

**दवंडीवाला** : (गाण्याच्या चालीवर)

ऐका हो तुम्हि ऐका
ऐका हो ऐका ! !
आजपासुनी सर्व बोलणे
व्हावे केवळ गाणे गाणे
केवळ गाणे आणि तराणे
चालणार नच इतर फलाणे
राजाज्ञा जो मोडिल कोणी
देउ सुळावर त्यास तत्क्षणी
ऐका हो तुम्हि ऐका ! !



(दवंडी संपते. मग रंगमंचावरील प्रकाशात दोन राजदूत हातात भाले घेऊन एकमेकांशी बोलत येतात.)

**पहिला** : (हसत) छे छे ! हसून हसून आपलं तर पोट दुखायची वेळ आली बुवा ! जिकडं बघावं तिकडं लोक नुसतं गाताहेत. साधं बोलणं नाहीच कुठं.

**दुसरा** : महाराजांची आज्ञा आहे ना ! कोण मोडणार ?....

**पहिला** : काय एकेकाचे आवाज भसाडे आहेत रे ! त्यांनीसुद्धा गायचं म्हणजे काय हे ?

**दुसरा** : लोक अगदी त्रासून गेले आहेत.

**पहिला :** शूऽ! कुणी गद्य बोललं तर त्याला पकडायचं हे आपलं काम. आपणसुद्धा नाही बोलायचं.

(गात) गद्य कोण बोलतो, त्यास मी पकडतो
अन् सुळावरी त्यास मी चढवतो.

**दुसरा :** ए, ते बघ ती दोघं नवरा-बायको भांडत इकडंच येत आहेत. बाजूला उभं राहून ऐकू या. साधी भांडताहेत की गाण्यातच?

**पहिला :** चल तर लवकर.

(दोघे बाजूला उभे राहतात. नवरा घाईघाईने येतो. मागून बायको येऊन त्याचा हात धरते. दोघेही गाण्यातच बोलतात.)

**बायको :** तेल संपले, तूप संपले, मीठ संपले;
स्वैपाक आता मी करू कशाचा?

**नवरा :** (रागावून) ए माझे आई,
नकोस खिकाळू!
हा चाललो बाजाराला
आणून देतो माल तुला

**बायको :** (त्याच्या हातात पिशवी देत)
अन् येताना शेर दोन शेर
तुम्ही वांगी आणा छान सुरेख

**नवरा :** (बायको गेल्यावर स्वतःशीच गुणगुणत)
आणितो मी आणितो
छान वांगी आणितो
तेल तूप मीठ वांगी
आणखी ती काय सांगी

(आठवत आठवत नवरा जातो. दोघेही राजदूत हसत हसत पुढे येतात.)

**पहिला :** कमाल आहे बुवा! भांडणसुद्धा गाण्यात करायचं!

**दुसरा :** आता हे नवरोजी गेले बाजारात. तिथं ही गर्दी माणसांची! प्रत्येक जण गाण्यातच बोलतोय!

**पहिला :** खरंच बाजारात तर मोठी गंमत उडाली असेल नाही?

**दुसरा :** अरे, गंमत म्हणजे काय? नुसती मजा चाललीय मजा! समज, तू दुकानदार अन मी गिऱ्हाईक. मग मी विचारायचं—

(गात) दुकानदारदादा, अहो दुकानदारदादा
तुम्ही कसा दिला कांदा?

**पहिला :** (दुकानदाराची नक्कल करत गात)
रुपयास चार शेर
रावसाहेब, रुपयास चार शेर.

**दुसरा :** (गात) द्या तर आम्हां एकच शेर
घालु नका हो कचराकेर.

**पहिला :** (गात) माल अमुचा पांढराफेक
कांदे किती हे स्वच्छ सुरेख!

**दुसरा :** (गात) चार आणे नाहीत फार
मांडून ठेवा आज उधार.

**पहिला :** (गात) नाही नाही नाही नाही, नाही चालणार
आज रोख अन् उद्या उधार.

(दोघेही खूप हसतात. मग नेहमीच्या आवाजात बोलतात.)

**पहिला :** का रे, बाजारात ही गंमत! मग राजवाड्यात किती मौज उडाली असेल?

**दुसरा :** राजवाड्यात? अरे तिथं तर साधं गाणं नाही. शास्त्रीय संगीत, सगळं रागदारीत चाललंय.

**पहिला :** चल, तिथली गंमत प्रत्यक्षच बघितली पाहिजे. चल, चल लवकर.
('गद्य कोण बोलतो' हे गाणे म्हणत दोघेही जातात. रंगभूमीवर थोडा वेळ अंधार. मग राजवाडा दिसतो. लोक महाराजांचा गाण्यात जयजयकार करतात—'जयजयकार महान, आपुला जयजयकार महान.')

**महाराज :** (गाणे म्हणत प्रवेश करतात.)

आलो आलो मी

राणी कुठे आमची ?

**राणी :** (गात) ही इथे महाराज मी.

**महाराज :** (गात) आज तुझे तोंड सुकले कशाने ?

**राणी :** (गात) या पडशाने मज गांजियले. (सटासट शिंकते.)

**महाराज :** (गात गात आज्ञा करतात.)

जा जा जा झणी घेउन या वैद्या.

(एक सेवक जातो. तेवढ्यात आत आरडाओरड. 'महाराज....महाराज' अशा गाण्यातील हाका ऐकू येतात.)

**महाराज :** (घाबरून गातात) अरे, काय झाले ?

**सेवक :** (गडबडीने प्रवेश करून गातो.) महाराज....

**महाराज :** (गात) अरे, काय झाले ?

बोल लवकरी.

**सेवक :** (गात व ताना घेत) महाराज....

**महाराज :** (गात) अरे बोल ना झडकरी.

**सेवक :** (गात) महाराज, आपुला प्रिय राजवाडा....

**महाराज :** (गात) पुढे बोल गद्ध्या—

**सेवक :** (ताना घेत तीच ती ओळ घोळून घोळून म्हणतो.)

महाराज, आपुला प्रिय राजवाडा....

**महाराज :** (संतापून गात) बोल लवकरी.

**सेवक :** (गात) आपुला प्रिय राजवाडा....

**महाराज :** (चिडून नेहमीच्या सुरात) आता बोलतोस लवकर का मुंडकं उडवू तुझं ?

**सेवक :** (गातगातच) आपुला प्रिय राजवाडा

अन् जळुनि खाक झाला.

**महाराज :** (घाबरून) काय ? माझा राजवाडा जळला ? मेलो, ठार मेलो मी. अन् मूर्खा, तू हे आता सांगतोस ?

**सेवक :** (नेहमीच्या आवाजात) क्षमा करावी महाराज, पण आपलीच आज्ञा होती ना सगळं गाण्यात सांगायचं म्हणून ?

**महाराज :** खड्ड्यात गेली ती आज्ञा. प्रधानजी—

(प्रधानजी येतात.) प्रधानजी, लोकांना म्हणावं नेहमीप्रमाणं बोला.

**प्रधानजी :** आज्ञा सरकार. अन् राजवाडा सुखरूप आहे आपला. थोडक्यात वाचला. आग विझवली.

**महाराज :** फारच छान. उत्कृष्ट. आमच्या आज्ञेनं हा सगळा घोटाळा झाला. हे पाहा, आता जो कोणी गाईल त्याला सुळावर चढवण्यात येईल, अशी दवंडी लगेच पिटवा.

**प्रधानजी :** हां हां महाराज, लहान तोंडी मोठा घास मी घेतोय खरा ! क्षमा असावी. महाराज, अती तिथं माती. आपण ही आज्ञा परत घेतलीत तर उपकार होतील.

**महाराज :** शाबास प्रधानजी, पटलं आपल्याला. रद्द केली आम्ही आमची आज्ञा. खरं आहे तुमचं. अती तिथं माती–असं म्हटलंच आहे....कुणी बरं म्हटलंय ?

**प्रधानजी :** पण आज्ञा रद्द झाली ना ?

**महाराज :** झाली म्हणजे काय ? झालीच !

—द. मा. मिरासदार



**अभ्यास :**

१. आजपासून आपल्या राज्यात सगळ्यांनी गाण्यात बोलायचं अशी आज्ञा राजाने कशासाठी दिली?

२. राजाच्या आज्ञेमुळे कोणत्या गमती घडल्या?

३. 'अती तिथं माती' असे का म्हटले आहे?

४. हा संवाद वर्गात करायचा आहे. यातील कोणते काम करणे तुम्हांस आवडेल? का?

५. पुढील शब्दसमूहांचा अर्थ सांगा :

हातवारे करणे, कडेलोट करणे, सुळावर चढवणे, रद्द करणे.

**व्याकरण :**

खालील वाक्ये वाचा :

(अ) गवईबुवा शास्त्रीय संगीत गातात.

(आ) लोक अगदी त्रासून गेले आहेत.

(इ) राजवाडा जळून खाक झाला.

वरील वाक्यांत गवईबुवा, लोक व राजवाडा यासंबंधी आपणांस माहिती मिळते. प्रत्येक वाक्याचे दोन भाग पाडता येतात—

| क | ख |
|---|---|
| गवईबुवा | शास्त्रीय संगीत गातात. |
| लोक | अगदी त्रासून गेले आहेत. |
| राजवाडा | जळून खाक झाला. |

ज्याच्याविषयी सांगितले आहे ते 'क' खाली दिले आहे. वाक्यात ज्याच्याविषयी सांगितले जाते त्याला उद्देश्य म्हणतात. उद्देश्याबद्दल जे सांगितले गेले आहे ते 'ख' खाली दिले आहे. उद्देश्याबद्दल जे सांगितले जाते त्याला विधेय म्हणतात. 'गवईबुवा', 'लोक', 'राजवाडा' ही उद्देश्ये आहेत. 'शास्त्रीय संगीत गातात', 'अगदी त्रासून गेले आहेत', 'जळून खाक झाला' ही विधेये आहेत.

१. खालील वाक्यांतील उद्देश्ये व विधेये ओळखा :

(अ) गुंफा अंधारीच आहे.

(आ) सारे ससे आरोळ्या मारू लागले.

(इ) कासवांची मिरवणूक निघाली.

# ३८. नोहाची नौका

फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ही. नोहा हा एक सुखी आणि समाधानी माणूस होता. एके दिवशी सकाळी उठल्यापासून तो आणि त्याचे तीन मुलगे भराभर मोठमोठी झाडे पाडू लागले. लगबगीने फळ्याही कापू लागले. लोकांना आश्चर्य वाटले. हे काय काम चालले आहे ? आणि कशासाठी ?

नोहाला विचारले तर त्याला बोलायलाही फुरसद नव्हती. क्षणभर त्याने कामातून वर डोके काढले. तो म्हणाला, "महापुराची तयारी आहे बाबांनो ही ! मोठा पाऊस येणार आहे. त्यासाठी आम्ही एक भलीमोठी नाव तयार करत आहोत."

लोकांना खूप हसू आले. आकाशात तर कुठे ढगही नाही. याला वेड तर नाही लागले ? काहीतरीच बोलतो आहे !

पण नोहा काही वेडा नव्हता. साधाभोळा प्रामाणिक मनुष्य होता. तो सर्वांशी प्रेमाने वागे; प्राण्यांवर ममता करी. देवाची भक्ती करी. यामुळे तो देवाचा आवडता होता. एका रात्री त्याच्या स्वप्नात येऊन देवाने सांगितले, "बाबारे, हे सारे जग मी आता धुऊन काढणार आहे. आजपासून सात दिवसांनी खूप पाऊस पडेल. सगळीकडे पाणीच पाणी होईल. सारे जग बुडून जाईल. त्याकरता तू एक मोठी नाव तयार कर. ऊठ. ताबडतोब कामाला लाग. वेळ थोडा आहे."

जग निर्माण केले त्या वेळी देवाने माणसासाठी सगळ्या सुखसोयी केल्या होत्या. त्याला वाटले होते की आता सगळी माणसे सुखाने, एकोप्याने राहतील. पण देवाने पाहिले, की माणसे आपसांत खूप भांडत आहेत. स्वार्थ, खोटेपणा वाढला आहे. गरिबांवर जुलूम चालला आहे. देवाला वाईट वाटले. त्याला माणसाचा राग आला. त्याला वाटले आपण किती सुंदर जग निर्माण केले होते आणि माणसाने ते किती बिघडवून टाकले ! आता ते धुऊन स्वच्छ केले पाहिजे आणि यासाठीच देवाने नोहाला सावध केले होते.

नोहा आणि त्याचे मुलगे रात्रंदिवस राबू लागले. फळ्या जोडल्या जाऊ लागल्या. पाहता पाहता एक प्रचंड नौका तयार होऊ लागली; खूप मोठी, लांब व रुंद. लोक यायचे, गमतीने बघत उभे राहायचे, हसायचे. चेष्टेने म्हणायचे, "हं! कधी यायचा आता तुमचा महापूर? अजून तरी थेंबही नाही पाण्याचा!"

पण नोहाचे काम रात्रंदिवस चालूच राहिले. झोपायला वेळ नाही, की जेवायला वेळ नाही. सात दिवस आणि सात रात्री अखंड खपून त्याने भली मोठी नौका तयार केली. नौका कसली? तिला ना शिडे ना वल्ही! तिमजली घरच होते ते एक. वरती छप्पर, उंचावर खिडकी, बाजूला दार. आत मोठे कोठार, त्यात भरपूर धान्य आणि चारा साठवलेला.

आकाशात ढग जमू लागले. तसे या नौकेकडे लहान-मोठे प्राणी धावत येऊ लागले. जंगलातून वाघ-वाघीण, सिंह-सिंहीण, हत्ती-हत्तीण असे कितीतरी प्राणी धावत आले. ससे, उंदीर, खार अशा छोट्या प्राण्यांचीही धावपळ सुरू झाली. आकाशात पक्ष्यांची एकच गर्दी उसळली. पोपट, कावळे, कबुतरे, करकोचे, चिमण्या आणि असेच इतरही कितीतरी. सरपटत येणाऱ्या प्राण्यांनी तर जमीन झाकून गेली. तिथला प्रत्येक प्राणी नोहाच्या आसऱ्याला आला. मोठे प्राणी तळमजल्याला राहिले. लहान प्राणी वरती राहिले. पक्ष्यांनी मिळेल तिथली जागा पकडली. मग नोहाची बायको, मुलगे, सुना वरती आले. शेवटी नोहाने आत जाऊन दार लावून बंद केले.

पावसाचे मोठमोठे थेंब आले. पाहता पाहता पाऊस वाढला; मुसळधार पडू लागला. ओढे भरून वाहू लागले. नद्यांना महापूर आले. समुद्राचे पाणी आजूबाजूला पसरू लागले. हळूहळू नोहाच्या नौकेपर्यंत पाणी चढले. नौका पाण्यावर तरंगू लागली. वाहात जाऊ लागली. पावसाने सारखी झोड उठवली. सारी जमीन पाण्याखाली गेली. पाणी इतके वाढले, की ते डोंगर-शिखरांना जाऊन भिडले. मग तीही पाण्यात बुडाली. तरी पाऊस कोसळत राहिला. सतत चाळीस दिवस अन चाळीस रात्री.

मग खूप वारा सुटला. त्या वाऱ्याने ढग वाहून नेले. पाऊस थांबला.



तरी सारे जग पाच महिने पाण्याखालीच राहिले. त्यानंतर पाणी हळूहळू ओसरू लागले. नोहाची नौका पाण्यावर तरंगत चालली होती. दोन महिन्यांनंतर ती एका जागी थांबली. पाण्यात बुडालेल्या एका डोंगराच्या शिखराला ती अडली. पाणी थोडेथोडे उतरत होते. असे तीन महिने गेले आणि त्यानंतर डोंगरशिखरे पाण्यावर दिसू लागली. जमीन दिसायला अजून अवकाश होता. आणखी चाळीस दिवस थांबून नोहाने नौकेची खिडकी उघडली. प्रथम त्याने एक कबुतर बाहेर सोडले. अथांग पसरलेल्या पाण्यावर ते उडत राहिले. त्याला कुठे आसरा मिळाला नाही म्हणून ते परत आले. सात दिवसांनी ते पुन्हा सोडून दिले. ते दूरवर उडत गेले. संध्याकाळी परत आले. त्याच्या

खोलीत एक कोवळे पान होते. कुठेतरी झाडाला नवीन पालवी फुटली होती. पुन्हा आठवडाभर थांबून कबूतर बाहेर सोडले. या वेळी ते परत आले नाही पाणी आणखी ओसरले होते आणि दोन महिन्यांनी जमीन दिसू लागली. नोहाने नौकेचे दार उघडले. सारे प्राणी पटापट बाहेर आले. नौकेमध्ये जाऊन त्यांना वर्ष होऊन गेले होते. बाहेर स्वच्छ ऊन पडले होते. आभाळात इंद्रधनुष्य दिसत होते. नोहा आणि त्याची मुलेबाळे जमिनीवर उतरली. त्यांनी देवाची प्रार्थना केली. मग देव त्यांना म्हणाला, "आता तुम्हांला राहायला नवीन स्वच्छ जग दिले आहे. तुम्ही धान्य पिकवा आणि सुखाने राहा. आता पुन्हा मी असा प्रलय कधी करणार नाही. आभाळातली ही सप्तरंगी कमान पाहिली म्हणजे मला या गोष्टीची नेहमी आठवण होत राहील."

आणि मग नवीन जग सुरू झाले. माणसांची आणि साऱ्या प्राण्यांची प्रजा वाढत गेली. आता जगात कधी पाप फार झाले म्हणजे देवाला वाटते, की पुन्हा खूप पाऊस पाडावा, प्रलय करावा. पण ढगांवरचे इंद्रधनुष्य दिसले म्हणजे मग त्याला आठवते, की आपण नोहाला कबूल केले आहे—पुन्हा प्रलय करायचा नाही. जगाचा नाश करायचा नाही.

नोहासारखी चांगली माणसे जगात थोडी असतात. ती जग वाचवायचा प्रयत्न करतात आणि त्यांना यश येते.

—सौ. मीरा भागवत

**अभ्यास :**

१. प्रलय येणार हे नोहाला कसे समजले ?
२. पृथ्वीवर प्रलय करावा असे देवाने का ठरवले ?
३. नाव तयार करताना लोक नोहाला का हसत ?
४. नोहाने आरंभी कबुतराला बाहेर का सोडले ?
५. नोहासारख्या चांगल्या माणसांचा कसा उपयोग होतो ?
६. वाक्यांत उपयोग करा : लगबगीने, प्रलय, महापूर, पालवी, प्रचंड.



# ३९. खरे कौतुक

तालमीतल्या पोरांचा घोळका बजरंग वस्तादाच्या घरापुढे आला. म्हातारा बजरंग सोप्यावरच भिंतीला टेकून उकिडवा बसला होता.

त्याला बघून एक जण म्हणाला, "काय वस्ताद, येता न्हवं कुस्त्या बघायला ?"

बजरंग म्हणाला. "व्हय, निघतो घटकाभरानं; तुम्ही व्हा फुडं."

"येणार हे नक्की न्हवं ?"

"तर ! एवढी नामी कुस्ती मी चुकवीन कसा ?"

वस्ताद येणार हे नक्की कळल्यावर पोरे निघून गेली आणि म्हातारी बायजा तरातरा बाहेर सोप्यात आली. बनारसी जरीच्या फेट्याची एक जुनी घडी तिने उभ्यानेच बजरंगपुढे टाकली. सोन्याचे एक मोठे कडे त्या घडीतून निसटून बाहेर पडले. म्हातारी त्याकडे बघत म्हणाली, "हे कडं आणि पटका इकायचं नसलं तर न्हाऊ द्या, पर निदान कुठंतरी घानवट ठेवून आजच्या आज मिळतील ते पैसे घेऊन या. त्याकडं बघत बसून काय पोट भरणार न्हाई."

एवढे बोलून म्हातारी आत निघून गेली. म्हाताऱ्याची नजर मात्र पुढ्यातला तो बादली फेटा व ते सोन्याचे कडे यांवरच खिळून राहिली. बघता बघता त्याला जुनी आठवण झाली.—कुस्तीचे एक टोलेजंग मैदान डोळ्यांना दिसू लागले. माणसांनी फुललेल्या त्या मैदानात वीसबावीस वर्षांचा तरुण बजरंग आपल्या जोडीदाराशी मोठ्या शर्थीने लढत होता. त्याचा जोडीदार काही साधा नव्हता; दिसायला तर तो बजरंगच्या दीडपट होता. ताकतीला भारी होता, पण बुटक्या बजरंगापुढे त्याची डाळ काही शिजत नव्हती. मैदानातले लोक बजरंगाचेच कौतुक करत होते.

रिंगणासमोर एक चौथरा होता. त्या चौथऱ्यावर उंची बैठक अंथरली होती. त्या बैठकीवर महाराज आणि खाशा स्वाऱ्या बसल्या होत्या. त्याची नागासारखी चपळाई पाहून महाराज फार आनंदून गेले होते.

बजरंग फारच चपळाईने खेळत होता. आपला जोडीदार दमात उखडल्या-वर तर त्याने चढाईला सुरुवात केली. आपल्या प्रतिस्पर्ध्याला त्याने बघता बघता चारी मुंड्या चीत केला. सारे मैदान एकदम जयजयकाराने हादरले. पत्र्याच्या छपरावर वळवाच्या गारांचा सडकून वर्षाव व्हावा, तसा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. शिट्या, आरोळ्या यांनी कानठळ्या बसल्या. आनंदाने बेहोश होऊन बजरंगाने डंकी मारली आणि टुणदिशी उडी ठोकून तो चौथऱ्यावर चढला. त्याने लवून छत्रपतींना मुजरा केला.

छत्रपतींनी त्याची पाठ थोपटली. त्याच्या हातात स्वतः सोन्याचे कडे घातले, आणि बादली फेटा दिला. "ह्यो पटका दिलाय त्या यशश्रीसाठी! ह्यो

डोकीला लावून पाठ न्हाई मातीला लावायची!'' असे म्हणून हसत हसत हुजुरांनी परत एकदा त्याची पाठ थोपटली.

चाळीस वर्षांपूर्वी घडलेला तो प्रसंग जसाच्या तसा बजरंगाच्या डोळ्यांपुढे उभा राहिला. मन आनंदाने भारावून गेले. त्यातच तो गुंग होऊन गेला. एवढ्यात बायजा पुन्हा सोप्यात आली आणि रागावली, "असं नुसतं बघत काय बसलाय खुळ्यागत? त्यो पटका अन् ते कडं उचला आणि कुठनंतरी पैसे आणा बघू...उठा आधी."

बजरंगाने ते कडे उचलून आपल्या कुडत्याच्या खिशात ठेवले, डोक्याला पटका बांधला आणि न बोलताच तो घराबाहेर पडला. मन कावरेबावरे झाले होते. पायांत मणामणाच्या बेड्या अडकल्यागत वाटत होते. बजरंग तसाच पुढे निघाला. भान विसरून चालत राहिला.

प्रचंड गोंगाट कानावर आदळला आणि तो भानावर आला. नेमके कुस्त्यांच्या मैदानाजवळ त्याच्या पायांनी त्याला आणून सोडले होते. तो मैदानात गेला. प्रेक्षकांनी मैदान तुडुंब भरले होते. हौद्यातल्या लाल मातीत नवशिक्या पैलवान पोरांच्या जोड्या लढत होत्या. भारी जोडीतल्या कुस्त्या त्यानंतर लागणार होत्या.

विशीबाविशीचे एक जवान पोर हौद्यात उतरले. ते उंचेले पोर अंगाने चांगले मजबूत होते. वेताच्या कांबीसारखे शरीर लवचिक व चिवट होते आणि स्नायूंच्या बेडक्या नदीतल्या गोट्यांसारख्या टणक होत्या. त्याला जोड म्हणून एक धिप्पाड पोर मैदानात उतरले. ते उंचेपुरे पोर अंगानेही चांगले गच्च भरले होते. हे बळकट पोर आपल्या जोडीदाराला पहिल्या सलामीत चारी मुंड्या चीत करील, असे पाहताक्षणीच वाटले.

सलामी झाली. दोघांची अंगे एकमेकांच्या अंगाला भिडली आणि लोकांना पटले, की हे शिडशिडीत पोर चांगले तयारीचे आहे. चपळ आहे. घोटीव अवयवांचे आहे. ही जोड पाहून बजरंगाला स्वतःची पहिली कुस्ती आठवली.

म्हाताऱ्या देहातले रक्त सळसळू लागले, तापू लागले. दंडातले स्नायू फुरफुरू लागले. चट्दिशी तो उकिडवा बसला आणि डोळे मोठे करून प्रत्येक हालचाल टिपू लागला.

पोर चांगले तयारीचे होते. त्या धिप्पाड जोडीदाराला सारखे झुकांड्या देत होते. सुळकन् त्याच्या पकडीतून निसटत होते. चपळाईने पटात शिरण्याचा प्रयत्न करीत होते. पण जोडीदार ताकदीने भारी होता. ठेंगण्या बांध्याच्या पोराचे काहीच चालत नव्हते. बजरंगाला वाटले पोरटे आता मार खाणार! त्याच्या मनात चटकन आले, पोरगे जर झटका देईल तर हां हां म्हणता... आणि पोरानेही त्या क्षणी नेमके तेच केले. झटका देऊन ते हातोहात निसटले—मोठ्या कौशल्याने!

"शाब्बास र पठ्ठ्या! कुस्ती लढावी तर अशी!" तो ओरडला.

नंतर दहा मिनिटे दोघांची चांगलीच झटापट झाली.

"आस्ते....शिस्तीने घे....हां, दमानं..." भान न राहून तो सुचवू लागला. सुमारे पंधरा मिनिटे त्या पोराने प्रतिस्पर्ध्याची चढाई कौशल्याने रोखून धरली. परंतु पोराच्या मानाने फारच ताकदवान असलेल्या जोडीदाराने झटक्यात पुन्हा त्याला खाली घेतले. बजरंगाची खुलत आलेली कळी परत एकदा सुकली. त्याचा चेहरा खर्रकन् उतरला. तो स्वतःशीच हळहळला. त्याला तिथे बसवेना परंतु इतक्यात वेतासारखी लवचिक शरीरयष्टी असलेला तो पोरगा दसरंग फिरून चट्दिशी निसटला आणि उलट त्याने स्वारी भरली. बजरंगाच्या मनाचा गुलमोहर डहाळीडहाळीमधून परत एकदा फुलला. "शाब्बास रे वाघा! शाब्बास रे पठ्ठ्या!!" असे मोठ्याने उद्गारून तो टुणदिशी उठून चवड्यावर बसला. जोडीदार जो एकदा खाली गेला तो पुन्हा वर आलाच नाही. पोराने त्याला झटकन् चीत केले.

लोकांनी टाळ्यांचा प्रचंड कडकडाट केला; फेटे उडवले. एकदोघांनी तर मैदानात घुसून पोराला खांद्यावर नाचवले. गर्दीतून वाट काढत काढत बजरंग त्या पोराजवळ गेला. त्याने त्याची पाठ थोपटली. ते कडे आणि तो पटका त्याच्या

हातांत देत गद्गदलेल्या आवाजात तो म्हणाला, "पोरा, माझ्या आउक्षाची यशश्री तुझ्या हवाली करतोय—याचा मान शेवटपर्यंत राख ! महाराजांचा प्रसाद हाय त्यो !" असे म्हणून तो बाजूला झाला आणि महासागरात पडलेल्या पावसाच्या थेंबाप्रमाणे, हजारो लोकांच्या उसळलेल्या गर्दीत मिसळून गेला.

—बाबा पाटील

**अभ्यास :**

१. वस्ताद बजरंगाला त्याच्या पत्नीने कडे व पटका कशासाठी दिला होता ?
२. त्याने त्यांचे काय केले ?
३. कुस्ती कोणामध्ये लागली होती ? त्या कुस्तीत मधून मधून विजयाचे पारडे कसे झुकत होते ?
४. सोन्याचे कडे बजरंगाला कोणाकडून मिळाले होते ? कशासाठी ?
५. कुस्तीतील कोणत्या पेचांची नावे या वर्णनात आली आहेत ? ते समजावून घ्या.
६. बादली फेटा, घानवट, खाशा स्वाऱ्या, बेहोश होणे यांचा अर्थ सांगा.

**व्याकरण :**

१. मागच्या तीन वाघिणी पेटल्या. पेट्रोलचा भडका उडाला. चमनलालांना देशसेवेची जणू मोठी संधीच मिळाली. त्यांनी त्या वाघिणी तोडल्या आणि उलट्या दिशेने ढकलल्या, तोच प्रचंड स्फोट झाला.
   (अ) वरील परिच्छेदात आलेली नामे, सर्वनामे, विशेषणे व क्रियापदे ओळखा.
   (आ) वरील परिच्छेदात आलेली कोणतीही तीन नामे निवडा. त्यांची लिंगे व वचने ओळखा.

२. कंसात सुचवल्याप्रमाणे क्रियापदांची रूपे बदलून वाक्ये लिहा
   १. तो आघाडीवर गेला. (भविष्यकाळ)
   २. शिपाई देशासाठी लढतील. (भूतकाळ)
   ३. सुरेशने गाणे म्हटले. (वर्तमानकाळ)

---



# ४०. निरोप

बाळ, चाललास रणा
घरा बांधिते तोरण
पंचप्राणांच्या ज्योतींनी
तुज करिते औक्षण.

याच विक्रमी बाहूंनी
स्वतंत्रता राखायाची,
खांद्यावरी या विसावे
शांति उद्याच्या जगाची.

म्हणूनिया माझ्या डोळा
नाही थेंबही दुःखाचा;
मीहि महाराष्ट्रकन्या
धर्म जाणते वीराचा.

नाही एकहि हुंदका
मुखावाटे काढणार.
मीच लावुनी ठेविली
तुझ्या तलवारीला धार.

अशुभाची साउलीहि
नाही पडणार येथे;
अरे मीहि सांगते ना
जिजा-लक्ष्मींशी नाते.

तुझ्या शस्त्रांना, अस्त्रांना
शक्ति देईल भवानी,
शिवरायाचे स्वरूप
आठवावे रणांगणी.

धन्य करी माझी कूस
येई विजयी होऊन,
पुन्हा माझिया हाताने
दूधभात भरवीन !

—पद्मा

**अभ्यास :**

१. या कवितेतली आई जिजा-लक्ष्मीशी आपले नाते का सांगते ?
२. महाराष्ट्रकन्या कोणता धर्म जाणते ?
३. या कवितेच्या शेवटी आईने कोणती इच्छा व्यक्त केली आहे ?
४. या बाहूंवर उदयाच्या जगाची शांती विसावणार आहे, या कल्पनेचा अर्थ समजावून घ्या.



# ४१. तुका म्हणे

धन्य आजि दिन । झाले संतांचे दर्शन ॥
झाली पापातापा तुटी । दैन्य गेले उठाउठी ॥
झाले समाधान । पायी विसावले मन ॥
तुका म्हणे आले घरा । तोचि दिवाळी दसरा ॥ १ ॥

दया क्षमा शांती । तेथे देवाची वसति ॥
पावे धावोनिया घरा । राहे धरोनिया थारा ॥
कीर्तनाचे वाटे । वराडिया ऐसा लोटे ॥
तुका म्हणे घडे । पूजा नामे देव जोडे ॥ २ ॥

जे का रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥
तोचि साधू ओळखावा । देव तेथेचि जाणावा ॥
मृदु सबाह्य नवनीत । तैसे सज्जनाचे चित्त ॥
ज्यासि आपंगिता नाही । त्यासि धरी जो हृदयी ॥
दया करणे जे पुत्रासी ! तेचि दासा आणि दासी ॥
तुका म्हणे सांगू किती । त्याचि भगवंताच्या मूर्ती ॥ ३ ॥

